# ‘‘मृणमयी’’

## परीक्षण, समीक्षण, मूल्यमापन

## आणि रसग्रहणात्मक एक भाष्य

## {Critical appreciation}

माननीय गोपाल नीलकण्ठ तथा आप्पासाहेब दांडेकर यांची अध्यात्म जीवनावरील ही एक अप्रतीम कादंबरी आहे. जी खऱ्या अर्थानें ज्ञानेश्वरी जगली अशा एका मुलीची ही जीवन-गाथा आहे. १९७० सालीं ही कादंबरी प्रकाशित झाल्यावर पुढील वर्षांत मी पत्ररूपांत तिच्यावर क्रमाने ७ लेख लिहिले.

कादंबरीचें अंतरंग उकलून दाखवावे, दुस्तर्कांचें खंडन करावे आणि वाचकांना कादंबरींतील मुख्य वस्तु, तिच्या शुद्ध स्वरूपांत ग्रहण करता यावी म्हणून मी तो लेखन-प्रपंच केला. पत्ररूपांत असलेल्या त्या लेखांचेच हे परिष्कृत संकलन

आहे. हें संकलन करतांना मूळ पत्रवाङ्मयात्मक लेखांच्या स्वाभाविक सौंदर्याची हानी होणार नाही याची फार काळजी घेतली आहे.

वाचकांनी हे लेख वाचीत असतां एवढे ध्यानीं घ्यावे कीं, ज्याला लेखनाची कसलीच कला अवगत नाही अशा एका यःकश्चित् अतिसामान्य माणसाची कांहीं उंच, भव्य, दिव्य साकार करण्याची ही केविलवाणी धडपड आहे.

यासाठीं वाचकांनी हंसक्षीरन्यायानें यांतील सारग्रहण करून अधिक उणे असेल ते गोड करून घ्यावे.

जरि वास,नसे तिळ यांस,तरी तुम्हांस,अर्पिली सुमनें
अंजली,भरूनि वाहिली,भक्तिने दिली,म्हणुनितरि घेणें

रसिक वाचकांना एकच विनंति—

समिधाच सख्या या,
यांत कसा ओलावा
कोठून फुलापरि वा मकरन्द मिळावा
जात्याच रूक्ष या,
एकच त्या आकांक्षा
तंव आंतर अग्नि क्षणभर तरि फुलवावा.

खरा परमार्थ हा मठा-मंदिरांत नसतो तर तुम्ही जें नित्त्याचें सरळ-साधे जीवन जगतां, तेथेच तो पूर्णार्थानें प्रकट होतो; या सत्त्याचें दर्शन या कादंबरींत आपणास होतें.

नित्त्याच्या जीवनांत अध्यात्माचें अवतरण झालें तर सरळ-साधे जीवन किती मनोहारी होतें त्याचें प्रत्यंतर म्हणजे ही कादंबरी आहे—‘मृण्मयी.’

यामुळेंच रसाळ कथा-कीर्तनापेक्षां ही कादंबरी वास्तववादी असल्यामुळें सामान्य माणसाला व्यवहार्य असून खऱ्या अर्थीं लाभदायी आणि कल्याणकारी आहे.

तात्यांचें आयुष्य ही मनूच्या जीवनाची पार्श्वभूमि आहे. तें नीट समजावून घेतलें तर मनूच्या दिव्य जीवनाचा पूर्ण अर्थानें उलगडा होईल.

ही कादंबरी अतिशय सुबोध आणि बालबोध आहे. यांत पांडित्त्य आणि भाषेचा झगमगाट बुद्धि-पुर:सर टाळला आहे. खरे म्हणजे अतिशय साधे आणि सुबोध लिहिण्यासाठीं मुरलेल्या पांडित्त्याची जरूरी असतें. उत्तम भाषा पद्धतीचा गुण म्हणजे शुद्धता, सुबोधता आणि साधेपणा याचें उत्तम उदाहरण म्हणजे ही कादंबरी आहे.

या कादंबरींतील लोकभाषा कोंकणी आणि वऱ्हाडी आहे. बाकी सर्व कादंबरी प्रमाणभूत अशा पुणेरी भाषेंत आहे. वाचकांनी वरील दोन्ही भाषेंतील सौंदर्यस्थळांचा रसिकपणें आस्वाद घ्यावा ही विनंति

लोकमान्य टिळकांचें ''गीतारहस्य'' प्रकाशित झाल्यानंतर २५/३० वर्षें महाराष्ट्रांत त्यावरील अनुकूल-प्रतिकूल, टीका-प्रतिटीकांचें जें तुंबळ युद्ध माजलें आणि त्या निमित्तानें महाराष्ट्राच्या बुद्धीला जी विलक्षण धार आली, चिंतनाची जी गहनता प्राप्त झाली, त्याला तोड नाही. त्याचें नीट आकलन व्हावे असे ज्यास वाटत असेल, त्याला या कादंबरीवरील माझा अभिप्राय व प्रदीर्घ रसास्वादन प्रवेशिकेचें काम करील.

'रागिणी'— वा. म. जोशी. 'आहुती'— पु. य. देशपांडे

पारमार्थिक दृष्ट्या आजघडीला तरी मराठी साहित्य क्षेत्रांत तंत्र आणि आशय या दोन्ही दृष्टींनीं परिपूर्ण असणारी 'मृण्मयी'—{गो.नी. दांडेकर.} या कादंबरी व्यतिरिक्त एकहि कादंबरी आढळून येत नाही. मी फुशारकी मारीत नाही. पण मी नम्रपणे सांगू इच्छितो कीं, या कादंबरीवर इतकी तेजाळ टीका तुम्हांस कोठेच मिळणार नाही.

रविवार सकाळ, मुंबई पुणे, रविवार ता. ४ जुलै, १९७१

ग्रंथ परीक्षण आणि परिचय :

# गो. नी. दांडेकरांचे कादंबरीत मोहक भावबंधांचे दर्शन

**मृण्मयी** ले. : गो. नी. दांडेकर, : मॅजेस्टिक बुक स्टॉल, गिरगांव नाका, मुंबई ४, किं. १२ रूपये.

## कोकणचें वातावरण

श्री. गो. नी. दांडेकर यांच्या सर्व आत्मीय विशेषांचें प्रतिबिंब त्यांच्या या कादंबरींत पडलें आहें. श्री. दांडेकर आदर्शवादी आहेत त्यांचा पिंड भक्तिभावाचा असून त्यांच्या प्रत्येक वाङ्मय कृतीला येथील मातीचा सुगंध येत असतो. वास्तवाशी ते समरस होतात. विशेषत: ग्रामीण जीवनाचा त्यांचा चांगला अभ्यास आहे. ग्रामीण जीवनांतील पांढरपेशांचें जग त्यांच्या कलाकृतींत प्रकट होतें. त्यांची भाषा काहीशी भावविवश अशी वाटली तरी ती आवडणारा एक मोठा वाचकवर्ग आहे. कांहीं शब्दांना आणि शब्द सांप्रदायांना मधुर करून मुद्दाम लाघवीपण आणण्याचा ते पयत्न करतात. हें सारे सारे या कादंबरींत आहे. दांडेकरांची वर्णनशैली खूप रेखीव असते आणि त्यांची मतें पटोत अगर न पटोत, त्यांच्या लेखनांत वाचनीयता ही निर्विवाद असते. मृण्मयी या कादंबरीतला पहिला भाग कोकणातल्या एका गरीब आणि भाविक माणसाच्या खडतर जीवनयात्रेचा आहे. तात्याने जीवनांत कांहीं कमावले नाही. आपली मुलगी मनू हिला कसलेहि बौद्धिक समृद्धीचें सुख दिलें नाहीं. परंतु एक मोठा वारसा मात्र त्यांनी तिला दिला आणि तो ज्ञानेश्वरीचा. लहानपणा पासून त्यांनी तिच्या मनावर संत वाङ्मयाचे संस्कार केले आणि त्याचमुळें तिचें जीवन एवढे शांत व उदात्त बनले. दांडेकरांनी या साऱ्या कादंबरींत आपल्या वर्णनशैलीला दोन दोन असे विषय दिले आहेत. तात्या आणि मनू ही एक जोडी आहे आणि हीच मुख्य आहे. कादंबरीच्या मध्यानंतर मनूच शिल्लक राहते आणि वाचकांच्या

मनावर मुख्यत: तिचाच ठसा उमटतो. मनूचें भयानक व्यावहारिक जीवन आणि सूक्ष्म व सुंदर भावजीवन ही एक अशीच जोडी आहे. तळकोकण आणि वऱ्हाड या दोन प्रदेशांची वर्णनें अशीच जोडीने केली आहेत. तळकोकणाचें वर्णन करताना त्यावेळीं उत्कृष्ट काव्याच्या पंक्ति आपणाला वारंवार आढळतात आणि त्यामुळें एका वेगळ्याच आनंदाचा लाभ होतो. वऱ्हाडाचीहि पार्श्वभूमि सुंदर साधली आहे. साम्यविरोधाचें तंत्र वापरून कादंबरी रूचकर करण्यांत दांडेकर बरेच यशस्वी झाले आहेत.

'एकतरी ओवी अनुभवावी' असा आदेश संत नामदेव यांनी ज्ञानेश्वरीच्या भक्तांना दिला. हे जीवनांत कसे आचरावे याचे प्रात्यक्षिक दांडेकरांनी प्रस्तुत कादंबरींत दिले आहे. तात्या किंवा मनू यांच्या जीवनांत ज्यावेळीं कसोटीचे प्रसंग येतात तेव्हां ज्ञानेश्वरींतील उपदेश आठवून ही माणसे शांत चित्तानें त्यांतून पार पडतात. परंतु काही वेळा ज्ञानेश्वरींतील ओव्या देता याव्यांत म्हणून प्रसंग आणल्यासारखे वाटतात. एवढे मात्र खरे, कादंबरीभर केलेली सत्काव्याची पखरण आणि त्यांतून खेळविलेलें भावजीवन मोहक वठलें आहें. दांडेकर आदर्शवादी लेखक आहेत. यामुळें चांगले आणि वाईट यांचे असे दोन गटच ते पाडतात. चांगल्या माणसांत अवगुण औषधाला सापडायचा नाही आणि वाईट माणसांत कुठलीहि चांगली बाजू नसायची! या साच्यांतून दांडेकर बाहेर पडलेले नाहीत. पण तेच त्यांचें सामर्थ्यहि आहे. पण या कादंबरीचा आल्हादक आणि अभिनंदनीय भाग म्हणजे मनू आणि तिचा 'दादा' यांच्यातील अत्यंत मोहक भावबंध हा होय. मनूला हा कलाकार पहिल्याने पाहतो. तेव्हाच एखादा साक्षात्कार झाल्याप्रमाणे तो स्तिमित होतो. मनूहि मनांत अस्वस्थ होते. या अगदी पहिल्या भेटींत खोल रूजलेल्या बीजाचें रूपान्तर पुढे आदर्श प्रीतींत होते. एवढ्यांत मध्यंतरीच्या काळांत दोघांनीहि कांहीं कमी यातना सोसलेल्या नसतात पण प्रेमाचा तो वृक्ष वाढतच जातो. शेवटी एकाकी जीवन कंठणाऱ्या मनूकडे पाहुणा म्हणून दादा जातो तो प्रसंग फार बहारीचा आहे. बंधु-भगिनी प्रेमहित

नाही आणि निव्वळ प्रणयहि नाही असे एक वेगळे नातें दोघांत निर्माण झालेलें असतें. दादाच्या मनूकडील अल्पकाळाच्या वास्तव्याचें वर्णन दांडेकरांनी फार उत्कटतेने केले आहे. आजच्या अतिवास्तववादाच्या काळांत कदाचित कुणालाहि हे अशक्यहि वाटण्याचा संभव आहे. वासनांचा उघडा नागडा आविष्कार म्हणजे जीवन जगणे असे मानण्याचा आजचा जमाना आहे. मनोविश्लेषणा च्या नांवाखाली कांहीं विकृति कुरवाळीत त्याचें मंडन करावयाचे अशीच रीत दिसून येते. अशा वेळीं दांडेकरांनी एका प्रबल भावनेचें उन्नयन झाल्याचे मोठ्या कौशल्याने दाखविले. याबद्दल ते धन्यवादास पात्र आहेत. हे दुर्मिळ असले तरी अशक्य खास नाही. ज्या संस्कृतींत द्रौपदी आणि कृष्ण यांच्यासारखे लोकोत्तर आदर्श निर्माण झाले त्या संस्कृतीतल्या माणसांना तरी दांडेकरांनी रंगविलेल्या चित्रांत कांहीं अशक्य आहे, असे न वाटावे.

अभिप्राय लेखकानें आपल्या लेखावर दिलेलें शीर्षक असें आहें— ‘‘गो. नी. दांडेकरांच्या कादंबरींत मोहक भावबंधांचें दर्शन’’

सर्वसामान्य दृष्टीनें पाहिल्यास हें शीर्षक चूक आहें असे मुळींच वाटत नाही. मात्र मानवी जीवनाचें जें मूलगामी स्वरूप आहें, त्या दृष्टीनें पाहतां तें अगदी वरवरचें आणि दिशाभूल करणारें ठरतें. जसे एखाद्या ग्रंथाचें स्वरूप ठरवितांना त्यासाठीं वापरलेला कागद गुळगुळीत आहे आणि त्याचा टाईप सुबक आहे, सबब तो ग्रंथ उत्तम आहे असे म्हणावे तसे अभिप्राय लेखकाचें मत-प्रदर्शन पोरकटपणाचें वाटतें. आदर्श आणि मोहक भावबंध चितारण्यासाठीं लेखकाने कादंबरी लेखनाचा व्याप केलेला नाही. तसे समजणाराला विचारावे वाटते, ‘‘काय भुललासी वरलिया रंगा’’

चैत्र पालवी आणि मोहर, मोहक असतो, सुंदर असतो. इतकें असूनहि ती लक्षणीय वस्तु नव्हें. तृप्तीचें सार्थक मोहर नाहीं. आम्रफल आहे. ज्याची आम्रफलावर नजर नाही, दृष्टि नाही, त्याची ही बालवृत्ति त्याच्या प्रौढपणाला गौरवास्पद ठरते काय? अभिप्राय देणाराला मुख्य वस्तूच्या नाडीवर नेमके बोट ठेवता यायला हवे. या क्षेत्रांतला तो

निष्णात वैद्य मानला जातो. ज्याला नाडीच सापडत नाहीं तो वैद्य कसला! त्याला वैदूच म्हणावयास हवे.

'मृण्मयी' ही रामायणासारखे मधुर नीतिकाव्य आहे काय? हे मोहक, नैतिक, आदर्श भावबंध चित्रित करणे हा लेखकाचा ही कादंबरी लिहिण्या-मागील उद्देश म्हणता येईल काय? अभिप्राय लेखकाला निश्चितपणे तसे वाटते. 'कादंबरीभर केलेली सत्काव्याची पखरण आणि त्यांतून खेळविलेलें भावजीवन मोहक वठलें आहें.' असे ते म्हणतात. आणि त्या भावजीवनाचें स्वरूप विशद करण्यासाठीं त्यांनी लेखाच्या शेवटीं सर्वात मोठा पॅरेग्राफ लिहिला आहे. कादंबरीचा हाच भाग त्यांना आल्हाददायक आणि अभिनंदनीय वाटतो.

अभिप्राय लेखक विद्वान आहेत. मराठी भाषा आणि साहित्य यांचे जाणकार आहेत. तथापि इतकें असूनहि या कादंबरीवर अभिप्राय लिहिण्यास ते अगदीच अनधिकारी आहेत असे माझें स्वच्छ मत आहे. भाषा आणि साहित्य या दृष्टीनें त्यांनी अनायासें जें लिहिलें तें एखाद्या नवीनाला प्रयत्न करूनहि जमणारे नाहीं हें वाचतांक्षणींच मला

जाणवलें. निव्वळ याच दृष्टीनें पाहिले तरी त्यांनी तो शेवटचा पॅरेग्राफ लिहिला नसतां तर ते पुष्कळच अब्रू सांभाळून राहिले असते. मात्र शेवटचा तो पॅरेग्राफ लिहून त्यांनी सगळी चव घालविली आहे, स्वत:चा बोजवारा करून घेतला आहे. एका प्रबळ भावनेचें उन्नयन झाल्याचें ते म्हणतात परंतू हें उन्नयन म्हणजे नेमके काय व तें कसे होतें, त्याची प्रक्रिया कोणती, याबाबत ते अजाण आहेत असेच मी म्हणेन. आणि या उन्नयनाबद्दल त्यांनी कादंबरी लेखकाला धन्यवाद दिले आहेत. हें सर्व पाहून मनांत येतें कीं,

"गताऽनुगतिकोऽलोको न लोक: पारमार्थिक:" याशिवाय दुसरें काय म्हणतां येईल?

दादा आणि मनू यांचें बंधु-भगिनीचें नातें पाहून अभिप्राय लेखकाला बहु आल्हाद वाटला आहे आणि त्यांनी कादंबरी लेखकाला या मोहक भावबंधाबद्दल धन्यवाद दिले आहेत. पण जर का हेच दादा आणि मनू, कृष्ण आणि राधा या स्वरूपांत चित्रित केले असते तर मोहकपणा पार लयाला गेला असता. त्याऐवजी विषयलंपटता, लोलुपता आली असती. भावबंध शतखंड होऊन विकारांचें तांडव उभे राहिलें असतें. मग दांडेकर

धन्यवादाचे मानकरी न होता लाखोलीला पात्र ठरलें असतें. आणि या संबन्धांत भावनेच्या उन्नयनाचा लोप होऊन अधोनयनाचा घवघवीत साक्षात्कार झाला असता.

मी हें लिहिलें तें अतिशयोक्तिपूर्ण वाटेल पण हें अगदी यथार्थ आहे. अभिप्राय लेखकाची वैचारिक पातळी सरासरी इतक्याच उंचीची आहे. यापेक्षां अधिक वरची उंची गाठण्याची तिच्यांत कुवतच नाही. बिचाऱ्या अभिप्राय लेखकाच्या अज्ञानाची कींव करावी वाटतें! त्यांना या कादंबरीचें मर्मच कळले नाहीं. या संपूर्ण कादंबरीचा एक स्थिरभाव आहे; तो समजला तर पुढचें भाव-जीवन कळणार. नाहींतर नांव समजुतीचें, मात्र प्रत्यक्षांत पहावे तो सगळा अंधार! 'काय गातो हें कळेना। राग आळवीतो नाना।।' असे त्यांनी केलें आहें.

या महाशयांच्या एक गोष्ट ध्यानीं आली नाहीं की, दादा आणि मनू यांचें निर्माण झालेलें बंधु-भगिनीचें नातें गौण आणि केवळ नैमित्तिक आहे. मूळ सोडून प्रतिबिंबाला कवटाळूं पाहणें हें खुळेपणाचें लक्षण आहें.

गौण कसे ते सांगतो—

समजा, दांडेकरांनी, त्यांनी लिहिलेलें एखादे पुस्तक मला वाचण्यास दिलें आणि वाचून झाल्यावर या, चर्चा करूं म्हणून बोलाविले. त्याप्रमाणें आमची स्वारी गेली. ते बसा म्हणाले. आणि त्यांनी विचारले,"हं, बोला! कसे काय वाटलें पुस्तक" त्यासमयीं अस्मादिकांनी निरूपणास प्रारंभ केला. काय म्हणालो असेन!

आप्पासाहेब, आम्हीं तुम्हाला शतशः धन्यवाद देतो. तुमचें पुस्तक वाचून आम्हाला बहु आनंद झाला, आल्हाद वाटला! दांडेकरांना अर्थातच बरे वाटलें. मग आमचा वाग्गौघ दुथडी भरून वाहूं लागला. आप्पासाहेब, तुम्हीं लिहितां फार सुंदर! म्हणजे काय तर निळी शाई न वापरता हिरव्या शाईनें; त्यामुळें त्यांत वाचनीयता निर्माण होतें. तोडून लिहिण्याच्या आणि विरामचिन्हें वापरण्याच्या तुमच्या पद्धतीमुळें समाजापुढे एक आदर्श निर्माण होतो. तुम्हीं इतके एकदम लिहितां का? तुमचा हात दुखत नाही. मला वाटतें कीं, ही एक अशक्यप्राय वाटणारी गोष्ट आपण शक्य करून दाखविता हा आपल्या पुस्तकाचा एक अभिनंदनीय भाग आहे. इतके सर्व लोकांच्या कोलाहलांत

लिहितां हा नैतिक गुणादर्श ठरतो. तीन-चारशें पानें लिहितां ही तर लोकोत्तर करणी आहे. तुम्हीं चिकाटीनें लिहितां यावरून पुस्तकांतील विषयाची उत्कटता दिसून येते. आपलें पुस्तक म्हणजे बहार आहे नुसती! आम्हाला आमच्या वक्तव्यावर जबर विश्वास असल्यामुळें दांडेकर अपार समाधान पावले असतील असे मनोमनीं निःशंक ठरवून टाकले. मग काय सांगायचे महाराज! आमच्या या अपार ऋणांतून उतराई होण्यासाठीं म्हणून त्यांनी गरम चहाचा एक चषक आमच्यापुढे ठेवला आणि आम्ही तो प्राशन केल्यावर त्यांनी आम्हांस कोपरापासून सविनय वंदन करून आमच्या सहवासें सप्तपदेंच नव्हें तर सातसहस्र पदें चालून आम्हांस अगदी गांवपांढरीच्या पलीकडे रवाना केले.

हें सगळें अर्थातच अतिरंजित आहे. परंतु एखादे कथन चूक नसले तरी गौण असल्यामुळें कसे हास्यास्पद ठरतें त्याचें हें उदाहरण आहे. अभिप्राय लेखकाने अगदी असाच वेडेपणा केला आहे.

आतां नैमित्तिक कसे तें सांगतो—

एक दिवस, मी असाच रस्त्यांतून चाललो होतो. रस्त्यांत गर्दी होती आणि मी घाईत होतो. अशावेळीं अचानक माझी धाकटी बहीण शैला माझ्यापुढें चालत असलेली मला दिसली. मी झपझप पावले उचलीत तिच्यापर्यन्त पोहोचलो आणि तिचा हात धरून तिला विचारूं लागलो ''ए, शैले! इकडं कुठं निघालीस? अरे बापऽऽरे! ही तर दुसरीच मुलगी निघाली. ती माघारी वळली तशी भडकलीच. हे काय? कोण तुम्ही? '' पिसाळल्या नागिणीनं थयथयाट केला '' या अचानक हल्ल्याने मी दगडी पुतळ्यासारखा संवेदनाशून्य झालो. ती वारेमाप बडबडत होती. हे वाक्प्रहार आहेत का वाक्सुमनें आहेत एवढे कळण्याइतकीहि शुद्ध राहिली नव्हती. यानंतर मात्र नकळत माझे हात जोडले गेले आणि माझ्या तोंडून एवढाच उद्‌गार बाहेर पडला '' ताई, मला माफ करा. मला वाटलं माझी बहीणच चालली आहे. तुमचें नांव शैला आहे? अहो, तिचेहि नांव शैलाच आहे.'' ती क्षणभर स्तब्ध झाली. झाला प्रकार तिच्या ध्यानीं आला. आतां तिच्या मुद्रेवर अपराधी भाव आणि माझ्या विषयीं आदरभाव दोन्हीं एकाच वेळीं प्रतीत झाले. अजीजीच्या स्वरांत ती म्हणाली,'' भाऊ, माझी फार मोठी चूक झाली. कुठल्या तोंडानें मी

तुमची क्षमा मागूं '' अशी अतिशय दिलगिरी व्यक्त करीत आम्हीं एकमेकांना नमस्कार केला आणि आपापल्या वाटेला लागलो.

नेमकी याच वेळीं दुसरी एक घटना अशी घडली कीं, आमचें हें महाभारत झालें त्यावेळीं समोरच्या अमृततुल्य टी हाऊसमध्यें एक गृहस्थ अमृतपान करीत बसले होते. लेखक होते ते. त्यांना नवीन विषय हवा होता. विषय पुष्कळ होते पण त्यांतील एकहि त्यांच्या मनासारखा जमून येत नव्हता. अमृताचे घुटके घेत असतां त्यांनी आमचा हा प्रसंग अवलोकिला आणि त्यांच्या मनीं तो ठसला. त्यांनी लेखणी उचलली आणि तो प्रसंग त्यांच्या भाषेंत असा मांडला—

ती पुढे चालणारी आणि तो तिचा हात हातांत धरणारा, यांच्यातील ताई आणि भाऊ म्हटल्याने निर्माण झालेला मोहक भावबंध अत्यंत आल्हाददायक आहे. तिने वळून पाहिल्यावर जणूं साक्षात्कार झाल्याप्रमाणें तो स्तिमित होतो आणि तीहि मनांत अस्वस्थ होते यांतून पुढे आदर्श प्रीती निर्माण होते. मानवी वासनामय जीवनांत अशक्यप्राय वाटणारी गोष्ट इथें प्रत्यक्षांत घडली

आहे. दोघांच्या भावनांचें उन्नयन झालें आहें. हा प्रसंग दुर्मिळ असून त्यामुळें लोकोत्तर आदर्श निर्माण झाला आहे.

आतां असे पहा, ताई आणि भाऊ ही स्थायी भाषा होऊं शकते का? ही भाषा नैमित्तिक आहे, यांतील भावहि नैमित्तिक आहे. परस्त्री-परपुरूष हा यांतील खरा स्थायीभाव आहे. हें असे घडूं शकतें. अशक्य कांहींच नाही. शिवाय ताई आणि भाऊ म्हटल्याने आदर्श प्रीती कशी निर्माण होते ते समजत नाही. अभिप्राय लेखकाने असाच तऱ्हेवाईकपणा केला आहे.{ पहिल्या आणि दुसऱ्या दोन्हीं प्रसंगांतील अधोरेखित शब्द अभिप्राय लेखकाचे आहेत.}

अभिप्राय लेखक म्हणतात,“ मनूला चित्रकार प्रथम पहातो तेव्हां एकादा साक्षात्कार झाल्याप्रमाणें तो स्तिमित होतो आणि मनूहि मनांत अस्वस्थ होते.” या दोन्हींचें मूल्यमापन तुम्ही एकाच मापानें करणार कां? चित्रकारांचा साक्षात्कार आणि मनूचा अस्वस्थपणा हे दोन भिन्नभाव असतांना त्या दोघांना एकत्र आणण्याच्या खटपटीपोटीं हे महाशय ते दोन्ही भाव एकाच जातीचे म्हणून बेधडक

सांगतात हें केव्हढे धाष्ट्यर्! “पहिल्या भेटींत रूजलेल्या बीजाचें पुढे आदर्श प्रीतींत रूपांतर होते” कसलं बीज रूजलं? हें एक गौडबंगालच आहे. दोन भिन्न भाव असतांना तें एक बीज म्हणायचें आणि तें सुरवातीलाच भर्जित झालें असतांना त्याला रूजलें म्हणायचें हें निव्वळ कोळ्याच्या जाळ्याप्रमाणें कपोलकल्पित आहे. ते म्हणतात,“मध्यंतरीं पुष्कळ काळ लोटला तरी प्रेमाचा तो वृक्ष वाढतच गेला.” त्यांनी आतां हा अगदी कळस केला आहे. ‘दोघातील प्रेम.’ ही मुळांत चुकीची दृष्टि आहे. नंतर तो वृक्ष वाढला म्हणे! बगलेंतून काढून पुढे मांडावे तसे हे आहे. ही वाढ यांनाच कशीकाय जाणवली ते एक भगवंतच जाणे! मनूला दादांची—तेव्हढा एकुलता एक अपवाद वगळतां—एकदाहि आठवण झाल्याचे दाखविले नाही. आणि शेवटीं तरी दोघांत प्रेमांकुर होता व तो वाढत गेला म्हणून मनूने दादांना बोलावून घेतले असेहि दिसत नाही. उलट त्या बोलावण्यांत व्यावहारिक उद्देशच जास्त ठसठशीत दिसून येतो. आणि हीहि गोष्ट सोडून दिली तरी कोणीहि कोणाला, साधारण वा विशेष प्रेम असेल तसेच सहजगत्त्या आठवण झाली आणि तशी अनुकूलता असली तर बोलावते, त्यांत नवल

काय? विशेष कोणता? ‘एक वेगळे नातें निर्माण झालें.’ असे अभिप्राय लेखक म्हणतात. त्यांना कांहींहि समजत नाहीं हाच या सर्वांचा एकूण अर्थ आहे. ते समजतात तसें आणि तसलें निश्चितच नाहीं.

दादांचें अल्पकाळ वास्तव्य आणि मनूचें आतिथ्य याचें दांडेकरांनी उत्कट आणि बहारदार वर्णन केलें आहें पण तें बंधु-भगिनीच्या प्रेमांतून निर्माण झाले काय? तसे नातें नसून दुसरा कोणी थोर कलाकार घरीं आला असतां तर त्यांत उत्कटता आली नसती का? ही उत्कटता, हा बहारदारपणा नेमका कशामुळें आला? त्याचें मूळ काय? याचा अभिप्राय लेखकाला पत्ताच नाही. कादंबरींतील मूळ वस्तूलाच ते पारखे झाल्यामुळें त्यांनी सगळा गोंधळ केला आहे.‘ वासनांचा उघडा-नागडा आविष्कार म्हणजे जीवन असे मानण्याचा आजचा जमाना आहे.’ असे ते म्हणतात. याचा अर्थ ते हीन अभिरूचीचा वर्ग गृहीत धरून संपूर्ण समाजाविषयीं सिद्धान्त प्रस्थापित करतात. यामुळें नकळत फार मोठा विचार-दोष निर्माण होत आहे याची त्यांना जाणीव नाही. त्यांनी जो आदर्श कल्पून घेतला आहे, तो आज काय किंवा मागील

काय, कोणत्याहि काळांत कोणत्याहि वर्गाला शक्य होत नाही असे मुळीच नाही. आणि घटकाभर तसा तो शक्य होत नाही असे मानले तरी तोच आदर्श हें या कादंबरीचें प्रतिपाद्य ठरतें का? हा खरा प्रश्न आहे. मिशावाल्याला धोपटताना दाढीवाल्यालाहि धोपटायचे. कारण काय तर म्हणे दाढीवाल्याला मिशा आहेतच ना! आतां हेच पहा, भावनेच्या उन्नयनाचें म्हणून कृष्ण-द्रौपदीचें उदाहरण त्यांनी दिले आहें. भगवान कृष्णाचा प्रश्न नाही पण द्रौपदीच्या भावनांचें उन्नयन झालें हें सांगितलें कोणी यांना? आणि जरी झालें असे म्हणायचे असले तरीहि तें बंधु-भगिनीसारखे कितीहि अत्युच्य प्रेम असलें तरी त्यानें कालत्रयीं होणें शक्य नाहीं हें त्रिवार सत्य आहें.

अभिप्राय लेखांतील आणखी एक-दोन दोष दाखवून विधायक बाजू मांडण्यास सुरवात करतों. पहिला असा कीं, भाषा व साहित्य या क्षेत्रांत अचूक,समर्पक व अर्थपरिप्लुत शब्द-प्रयोग करणारे हे अभिप्राय लेखक येथे काय लिहितात पहा— “दांडेकरांचा पिंड भक्तिभावाचा आहे.” सरळ अर्थ असा होतो कीं, पारमार्थिक क्षेत्रांतील अनेक भक्ति-मार्गी मंडळी मनानें भोळी-भाविक असतात. अर्थात्

दांडेकर त्यापैकीच एक आहेत. या पलीकडे जाऊन दांडेकरांच्या कादंबरींत एक प्रातीभदर्शन आहे आणि त्या अलौकिक स्पर्शानें ते प्रभावित झाले आहेत, मोहरून गेले आहेत, पुलकित झाले आहेत अशी स्थिती त्यांच्या लेखनांत मुळीच जाणवत नाही. दुसरा दोष पहा—“ज्ञानेश्वरींतील उपदेश आठवून ही माणसे त्यांतून शांत चित्तानें पार पडतात.” त्यांचे हे दोन्हीहि शब्द-प्रयोग आणि वाक्य-प्रयोग मराठी चौथीच्या मुलाने निबंध-लेखन करतांना वापरावेत तसे वाटतात. हा कसलेला लेखक असे लिहितो हे पाहून नवल वाटतें. याचें एकच कारण आहे कीं, अध्यात्मिक प्रान्तांत ते अनधिकारी असल्यामुळें काय लिहावे आणि कसे लिहावे हे त्यांना समजत नाही. त्यांचे कांहीं सुंदर शब्द-प्रयोग आहेत. आपल्या या संदर्भात एक सांगतो.“ मनूचें भयानक व्यावहारिक जीवन आणि सूक्ष्म व सुंदर भावजीवन.” परंतु हें असे लिहूनहि मौज अशी कीं, हें आंतर भाव-जीवन नेमके काय आहे याचा त्यांना कांहींहि पत्ता नाही, बोध नाही. नुसते पोपटासारखे बोलल्यानें त्यामागे त्यासंबंधी समज आहे **{Understanding}** हे सिद्ध होत नाही.

आतां आमच्या मतें या कादंबरीचें प्रतिपाद्य काय तें विशद करण्यासाठीं प्रथम विचाराला चालना म्हणून कांहीं विवेचन करतो.

मनूचें व्यक्तित्त्व कसे आहें? ती एक आदर्श भगिनी, उत्तम प्रवचनकार, दुर्गाची अजोड सखी इत्यादी गुणविशेषांनी युक्त अशी ती लेखकाला आपल्यापुढे उभी करायची आहे काय? तिच्या व्यक्तित्त्वाचे हे सगळे पैलूं दिसून येतात परंतु दांडेकरांचा ही कादंबरी लिहिण्यामागे हाच उद्देश आहे असे म्हणता येईल का? दादांचें वास्तव्य आणि मनूचें आतिथ्य याचें दांडेकरांनी फार बहारदार वर्णन केले आहें. याविषयीं दुमत होण्याचा प्रश्न नाही. तें सगळे अत्यंत नेटके आणि देखणे शब्द-चित्र आहें. तरीहि आमची आंतरसाक्ष अशी आहे कीं, तें सर्व गौण आहे आणि ‘अवसरे करूनी प्राप्त’ म्हणजे ज्याला ‘प्रसंगपरत्वे प्राप्त’ म्हणतात तसे तें आहे. वर सांगितलेले व्यक्तिविशेष ध्यानीं आले म्हणजे मनूचें दर्शन झालें अथवा ती आम्हांस समजली असे म्हणतां येईल काय? मनू विशुद्ध नीतीची मूर्ति आहे हें तर उघडच दिसतें. परंतु एवढे सर्व कळले तरी मनू पूर्णार्थानें आकलन

झाली असे म्हणतां येईल काय? याचें उत्तर—ती मुळीच समजली नाहीं असे आम्हीं ठासून सांगूं. हें कळण्यासाठीं एकच उपाय आहे. येथे चंडोलगती हवी. ज्ञाताच्या प्रान्तांतून अज्ञाताच्या प्रान्तांत झेप घेतां आली तरच 'मनू' उलगडेल आणि कादंबरीचें मर्म हातीं येईल. येथला प्रवास एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी असा सरळ नाहीं. कादंबरीकाराने निर्मिलेल्या प्रसंगाचा **Jumping board** सारखा उपयोग करायचा आणि अज्ञाताच्या दुसऱ्या प्रांतात उडी मारायची. स्वप्नसृष्टीतून आपण प्रत्यक्षसृष्टींत येतो त्यावेळीं आपण कसा प्रवास करतो? याचा अर्थ तो प्रवासच नसतो. आपण झट्कन त्या प्रान्तांतून या प्रान्तांत येतो. याला अध्यात्मिक भाषेंत **Leap** म्हणतात. अभिप्राय लेखकामध्यें ही क्षमता नाही. त्यासंबंधी त्यांना गंधहि नाहीं असे जाणवतें.

अभिप्राय लेखकाने दिग्दर्शित केलेले सुंदर, मोहक, उदात्त इत्यादि सगळे व्यक्तिविशेष,
कादंबरी लेखकाची खास म्हणून 'मनू' ची जी मूर्ति,
त्यांच्या प्रतिभेच्या सिव्हासनावर विराजमान आहे,
तिच्या पासंगालाहि ते पुरणारे नाहीत.

## ही मनूची मूर्ति कशी आहे !

'मृमयी' मी अगदी प्रथम वाचण्यास घेतली. त्यावेळीं वाटले कीं, य. गो. जोशी यांच्या 'सुबोध ज्ञानेश्वरी' प्रमाणे अथवा रवींद्र भट यांच्या 'इंद्रायणी काठीं' या कादंबरी प्रमाणे ती सुखवील, रिझवील, आनंदीत करील पण ती डंख मारील, दंश करील असे ध्यानींमनींहि नव्हतें. पण प्रत्यक्षांत मात्र तसे घडलें खरें ! नंतर ध्यानीं आले कीं, या कादंबरीमध्यें एका अमृतमय नागिणीचा दंश आहे. हा दंश ज्याला झाला आणि त्याच्या लहरी ज्याने अनुभविल्या त्यालाच या कादंबरींतील सगळा गुंता उकलेल आणि तिच्या मधील गूढ सूर्यप्रकाशा-सारखे स्पष्ट होईल. एऱ्हवी हजार तऱ्हेचे आक्षेप येतील या कादंबरीवर अथवा हजार तऱ्हेचे विपर्यास तरी होतील. यासाठीं अभिप्राय लेखकाचें उदाहरण पुरेसे आहें. कारण त्यांनी तत्त्वाचा खरोखरच विपर्यास केला आहे.

आप्पांनी १९७० सालीं प्रूफरीडिंगसाठीं प्रेसमधून आणलेलें मृण्मयीचें पुडकें, लगेच वाचून द्या असे म्हणून त्यांनी तें मला दिलें. त्याच दिवशीं नाईट ड्यूटींत मी तें संपूर्ण वाचून काढलें.

त्यावेळीं एकदोन पानें सरळ साधा अभिप्राय मी त्यांना लिहून दिला होता. तो येथें जसाच्या तसाच देतो.

“‘रात्रींच्या त्या शांततामय वातावरणांत आपली ‘मृण्मयी’ पूर्ण झाली.

उत्सुकतेने वाचीत गेलो. आपण साहित्यिक आहांत. मुद्दा गौण.

निसर्ग वर्णन, समाज निरीक्षण, प्रसंग योजना, व्यक्तिचित्रें अत्यंत सुरेख. तरी माझ्या दृष्टीने हीहि गोष्ट गौण.

अपार आनंद पावलो. म्हणजे आनंदाने टाळ्या वाजविल्या का? नाही. कारण तो अव्यक्त आणि अनिर्वचनीय होता. त्याने मी हरखून गेलो आणि हरवून देखील गेलो, कुठेतरी प्रशांत, अथांग अशा कशांततरी विरून गेलो.

कसे सांगणार तें ! केवळ अपूर्व !

अध्यात्मिक तेजोवलय असलेलें साहित्य कसें असतें त्याचें दर्शन झालें.’’

या पार्श्वभूमीवर अभिप्राय लेखक पहा. कसे बथ्थड वाटतात. अशा संवेदनाशून्य व्यक्तीचें ब्रह्मदेव देखील मनोरंजन करूं शकणार नाहीं. ब्रह्माऽपि तं न रंजयति। भर्तृहरी.

‘मृण्मयी.’ चा हा लेखक आरूणी, उद्दालक, श्वेतकेतू यांच्या संगतींत रमलेला आहे, सुखा-वलेला आहे.

माघ, भारवी, कालिदासादि पंडितांच्या पांडि-त्याचें लेणें लेयिला आहे.

ज्ञानदेव, तुकाराम, नाथादिकांच्या वाङ्मयमधूचें आकंठ पान केलेला आहे.

वैष्णवांच्या मांदियाळींत स्वताला घालून घेऊन चंद्रभागेच्या वाळुवंटात नाचला आहे.

आणि पांडुरंगाच्या चरणीं मिठी घालण्यापूर्वी ‘मीराके प्रभु गिरीधर नागर.’ त्याशी जवळीक केलेला आहे.

अलंकापुरीच्या सम्राटासारखे, प्रतिष्ठानीच्या अनाथांच्या नाथासारखे, आकाशाएवढया तुकोबा सारखे, मेवाडची मीरा आणि महाराष्ट्राच्या मुक्तेसारखे याचें हृदय हें भक्तहृदय आहे. मृण्मयींतील या संदर्भांतील कांहीं प्रसंग वाचतांना माझें नेत्र पाणावले. ऊर भरून आलें.

‘मृण्मयी’ चा हा मृण्मय, तात्यांचा हा तात, याचा पिंडच शुद्ध भक्तीचा आहे. कशी त्याची बैसका! कसे बोल! कशी प्रीयता! कसा निर्मळ

भाव!'त्या'च्याशी कसे घट्ट अनुसंधान! शरीरासहित वातावरण दिव्य झालं वाचन करतांना!

ईजारदारांचा जावई बागेंत मनूला प्रथम पाहतो, तेथपासूनचा तो संपूर्ण प्रदीर्घ प्रसंग, बहार आहे ती! तो प्रसंग कादंबरीचा गाभा आहे, नाभी आहे, केंद्र आहे. तो काढून टाकला तर 'प्राणाविना कुडी' तशी कादंबरीची दशा होईल. मी मागे म्हटल्याप्रमाणें येथे अमृतमय नागिणीचा दंश आहे. हरखून गेलो मी! मृण्मयीला पुढे करून या मृण्मयाने हा दिव्य प्रसंग उभा केला आहे. यांत काय नाहीं म्हणावे! भावना आहे, कल्पना आहे, नाटय आहे, थ्रिलिंग आहे, दिव्यता आहे आणि आणखीन काय काय तरी! माझ्यासारख्या शब्द-दरिद्री माणसानें काय लिहावें? जीवनांत 'त्या' चें पदार्पण झाले, 'त्या' च्या पदनूपुराचा पहिला झंकार झाला म्हणजे कसे आमूलाग्र परिवर्तन होते! असलेला कचरा जळतो, अपूर्व, जें जीवनांत कधीच नव्हतें, तें आकाराला येतें. पार इकडचें तिकडे होऊन जातें. मृण्मयीला पुढे करून—

राहूनि गुप्त मागे केलीस जादुगारी
रचिलीस दिव्य लीला बा! धन्य तूं चितारी

चित्रकारांच्या या मध्य प्रसंगावर मनूनेच केलेलें हें भाष्य पहा— ‘मृण्मयी’ पान २४४.
“दादा, एका भाग्यवंत क्षणीं मी माझं जीवन श्रीहरीच्या चरणीं वाहिलं होतं. तिथपासून हा सावलीदिवलीचा खेळ सुरू आहे. कधी अंधारून येतं तर कधी लख्ख प्रकाशत असतं. पण मला भरवसा आहे कीं, कधीतरी हें मातीचं मडकं त्या अमृताच्या झरीमधें बुडेल आणि मग असं उजाडेल कीं, ज्याला मावळणं माहीत असणार नाही.”

हे पाहिल्यावर ध्यानीं येईल कीं, या प्रसंगीं तिचें आमूलाग्र परिवर्तन झालें आहें. संपूर्णच कायापालट झाला आहे तिचा. येथून पुढे मनूला लौकिकार्थानें घेतां येणार नाहीं. लौकिकार्थ येथे संपला. येथून पुढे इहवादी दृष्टि अपुरीच नव्हें तर दिशाभूल करणारी म्हणजे पर्यायाने अनर्थकारीहि ठरूं शकते.

असे मानावयास हवे कीं, तात्या गेल्यापासून मनू बंगल्यामध्यें ४/५वर्षें तरी ज्ञानेश्वरी सांगत असली पाहिजे. तात्यांच्या सहवासांत तिचें संतवाङ्मयाचें अध्ययन झालेलेंच होतें. बालपणा-पासून तिच्या आजीविकेचा आधार तात्याच होते. ते गेल्यावर स्वत:च्या पायावर उभे राहून जीवन

जगण्यास आतां तिची सुरवात झाली. आणि हीच स्थिती पारमार्थिक जीवनाचीहि झाली. किंबहुना जीवन आणि परमार्थ या आतां वेगवेगळ्या गोष्टी राहिल्याच नाहीत. आतां तिची खरी साधकावस्था सुरूं झाली. आणि त्या साधकावस्थेची कलेकलेने उत्तरोत्तर होणारी वाढ, तिच्या वेळोवेळीच्या चिंतनावरून आणि बाह्य जीवन पद्धतींत क्रमाक्रमाने होत जाणाऱ्या बदलावरून दिसून येते. आतां कादंबरींतील हे संदर्भ पहा—

साधकावस्थेची सुरवात अथवा प्रारंभ—

"ती उंच रामकाठी आकाशीं मिसळूं पहात होती. अनंतामध्यें. जणूं ती सुचवीत होती कीं, बाई गे, सगळ्यांनाच शेवटी इथं विलीन व्हायचं आहे. अव्यक्तांत. उपजतं ते नासतं. नासतं ते पुन: दिसतं हे तर जणूं रहाटगाडगं आहे. इथं राम अन् कृष्णही तर गेले. त्यांच्याही पाऊलखुणा उरल्या नाहींत तुझ्या तात्यांची काय कथा? ही जी प्रचंड धरित्री दिसते—नांगरलेली. कुळवलेली. एकच भूमि पण नाना ढेकळांनी नाना झालेली. झुडपं उगवलेली. कितीकांची आश्रयभूमि. कितीकांची दहनस्थली. पण ही देखील उद्या त्याच वाटेनं जाईल. सगळं एकंकार होईल. उरेल एक सहजावस्था.

एकदम चमत्कारल्यें. हें वाचलं तर होतं. पाठही केलं होतं. अर्थ कळायला मात्र मोल द्यावं लागलं तात्यांच्या मरणाचं !

अथवा जागिनलिये वेळे । स्वप्न मनींचें मनीं मावळे । तैसें प्राकृत प्रकृतीं मिळे । कल्पक्षयीं ।।

पावसाळ्यांत तरारलेली गवतं कडकडत्या उन्हाळ्यांत दिसेनाशी होतात. वादळ आकाशांत विलीन होतं. तरंगांच्या कोटिकोटी जलाशयांत हारपतात. जागं होता क्षणीं अवघी स्वप्नसृष्टि मावळते. तसं कल्पक्षयाच्या क्षणीं हें अवघं प्रकृतीममध्यें विलीन होतं.''मृण्मयी'पान८९ '' पण उघडया आभाळाखाली का? तसं लटकं बोलून मी तात्यांचं मजवरलं ऋण उणं करूं इच्छिणार नाहीं. जें आवरण छिन्नविच्छिन्न होत नाहीं, ज्यावर कल्पांतींचे घावही वाजत नाहींत, असं संतवाणीचं कवच त्यांनी मोठ्या स्नेहानं मजवर लेववलं होतं तात्यांमुळेंच मला लाभली होती बाबांची कृपा. ते म्हणाले होते, 'सुख भेटलं, तर उतूंमातूं नोय्. दुःख कोसयलं अंगावर, तर चेपून चिरडून जाऊ नोय्. त्याचं स्मरन कराव्, अन् मंग मस्त जगाव्' '' 'मृण्मयी' पान ८९.'' 'कुठही राहूं. देवळामागं ओसरी आहे—' 'मोकळी!' 'असेना का मोकळी, तुला मला कोण खातंय? एवढीं कांहीं माणसं पशु झालीं नाहींत.

तिथही तुला बरं न वाटलं तर आडकूजीच्या शेतांत कोप घालून राहूं. असं काय करतेस आई? तात्या वारंवार बाबांचा अभंग म्हणत 'फुटे तरूवर उष्ण काळ मासीं, जीवन तयासी कोण घाली! कोणें केली बाळा दुग्धाची उत्पत्ति!' तेव्हां निश्चिंत अस! चोचीच्या आधी चारा निर्माण करतो तो तुला मला विसरला नसेल'' मृण्मयी पान ९०.

साधकावस्थेचा मध्य—

'' 'तुझा अपमान होता कामा नये.' तोंडावर पदर धरून बाहेर पाहात आई म्हणाली, 'गरिबाचा कसला मान नि कसला अपमान बाळा?' मी निग्रहानं म्हटलं, 'ज्या क्षणीं अपमान होईल, त्या क्षणीं आम्ही चालत्या होऊं!' 'कुठं' 'कुठही आई! तीर्थयात्रा करीत हिंडूं. तूं झाडाखालीं बसत जा. मी अभंग म्हणून कोरान्न मागत जाईन. दुसरे दिवशीं दुसरं गांव.' आई माझ्या डोळ्यांकडे पाहत राहिली. मग म्हणाली, 'हे काळेभोर मोठ्ठाले डोळे घेऊन—' 'तर मग सूरदासानं केलं ते मी करीन. हे डोळेच शाप ठरूं लागले तर ते ज्याचे त्याला देऊन टाकीन!' उसासा सोडून आई म्हणाली 'मुलगी कुणाची तूं? यांची!' '' मृण्मयी पान ९३.

''कसं होतं ज्ञानोबाचं! अशी एकेक ओवी कळायला लागली. ती जणूं काय दिवली. ती

हातीं घेऊन पुढं झाले तर परमार्थाच्या अंगणीं दिसूं लागलं. नवे नवे अर्थ कळूं लागले. अंग मोहरून जाऊं लागलं. ......आपलं आपण भोगावं'' मृण्मयी पान ९३,९४. ''लाजेनें मी अगदी एवढीशी होई. .........ओवीच्या अर्थाबरोबर वहात जावं'' मृण्मयी पान ९५.

'' जो जो चिंतन करावं तों तों ध्यानीं येई........... .....दुसरें दिवशीं तेच अधिक बांधिवपणें बंगल्यांत बोलावे मृण्मयी पान ९६,९७.

साधकावस्थेची शेवटची स्थिती–

'' जनाबाईची कथा तुला ठावकी असेल............. उठा उठा चक्रपाणी। उजाडले म्हणे जनी।।'' मृण्मयी पान १०३, १०४, १०५.

''ज्ञानोबानी म्हटलं आहे.......'' मृण्मयी पान १११.

''मुळीच घेतलं नसतंस,.........................आपण करून काय होतं ग बाई! मी त्याला शरण जाते. ज्याच्या चरणीं लीन होऊन ही एवढाली जीवनं कृतार्थ झाली. त्याच्या पायीं स्वत:ला घालून घेते. म्हणते कीं,' करी या तिमिराचा नाश। उदय होवोनी प्रकाश। तोडी आशापाश। करी वास हृदयीं।।'' मृण्मयी पान ११७, ११८.

''ऐकलंस दुर्गे, ....................अशी जिवंतपणी अन् मरणाअंती धरत्रीला मिठी घालावी'' मृण्मयी पान १२०, १२१.

अशी तिची उच्च कोटीची साधना झाल्यावर चित्रकारासंबंधीचा तो मध्य प्रसंग घडून आला.

''एकदम चमकून समोर पाहिलं...........येथ पासून ते...............सगळं विश्व झळाळून गेलं. अंधार कसा तो उरलाच नाही. रिती झाले. लख्ख मोकळी. मृण्मयी पान १२२ ते १३१.

आणि त्याच क्षणीं तिची साधकावस्था संपली. तिने स्वतःच म्हटलेला भाग्यवंत क्षण म्हणजे हाच. पुन्हा एकदा पहा—

''दादा, एका भाग्यवंत क्षणीं मी माझं जीवन श्रीहरीच्या चरणीं वाहिलं होतं, तिथपासून हा सावली दिवलीचा खेळ सुरू आहे................मग असं उजाडेल कीं, ज्याला मावळणं माहीत असणार नाहीं. मृण्मयी पान २४४.

आतां प्रियाशी कधी मीलन तर कधी विरह अशा अवस्थेतून प्रवास सुरू झाला. पण त्यावेळीं 'त्या'शी एकदांच जें नातं जडलं तें कायम स्वरूपाचं. मीलन असेल तरी तें 'त्या'च्याशीच आणि विरह असेल तरी तो 'त्या'चाच. अशा प्रकारे आतां तिच्या जीवनांत 'त्या'चें कायमचे

पदार्पण झालें. परतत्त्वाचा स्पर्श झाला. जीवनांत आमूलाग्र परिवर्तन झालें. क्रान्ति झाली. मनू आतां पहिली मनू राहिली नाही. तिच्यांतील कणान्‌कणानं आपलं पहिलं रूप टाकलं. आतां जें होणार आहे, जें घडणार आहे तें सर्व ‘त्या’च्या साक्षीनें आणि ‘त्या’च्यासाठींच. साधनकाळांत मनू द्वैतमय स्थितींतून अद्वैताकडे वाटचाल करीत होती, परंतु द्वैत प्रतीति मावळली नव्हती. सुखदु:खाचे, मानापमानाचे आघात-प्रत्याघात होतच होते. अशा वेळीं हा चित्रकारांचा हा मध्य प्रसंग घडून आला. यावेळीं अंतरांतील वादळ पराकोटीला गेले. ‘तळमळी चित्त लाहीपरी’ अशी चित्ताची उलघाल झाली. अंतरीं तुफान उठले. क्लेश होऊं लागलें. माऊली म्हणते, ‘‘तयापरी तो धनुर्धरू। जाहलासे दु:खे जर्जरू। जैसा ग्रीष्मकाळीं गिरिवरू। वणवला का।।’’ अशावेळीं तिच्यावर तो कृपाघनु करूणाघनु गोपाळु ओळला. काया शांत झाली. शीतलता प्राप्त झाली. अंतरांतील विकारांचें तांडव शांत झाले. अननुभूत आनंद प्राप्त झाला. हृदयीं विज्ञान प्रकट झालं. मीरा सखीनं पिलेलं जहर आतां मनूहि प्राशन करूं लागली. सुख-दु:ख, मानापमान काम-क्रोध यांच्या पलीकडे ती आतां जाऊं लागली

अंतरंग निवळण्यास सुरवात झाली. देहात्मभाव कमी कमी होत जाऊन आत्माकार वृत्तीचा उदय होत चालला. अहंकाराचा बडगा मोडला जाऊं लागला. संदेह शत्रूला पायी धरून आपटूं लागली. विकल्पाचा वधू केला. भवसिंधू थापे मारिला. काळाचे टांगे मोडिले. आणि जन्ममृत्यूचें मस्तक हाणून पार फोडून टाकण्यास सुरवात झाली. मीरा सखीप्रमाणे मनूहि अमर होत चालली.

आणि शेवटी मनूच्या स्थिर, नि:संदेह, निर्भय आणि निवांत निरूपणाला आतां सुरवात झाली, प्रारंभ झाला. मृण्मयी पान १३२ पहा.

मनूला झोंप केंव्हा लागली ते कळलेच नाही. जाग आली म्हणजे लौकिक तर आहेच पण सुदीन पहाट झाली. आत्मबोधाची जाग आली. अज्ञान अंधार नष्ट झाला. तिची ती स्थिती, तिचें तें मनोगत तिच्याच शब्दांत पहा—

"सगळं विश्व जणूं झळाळून गेलं. अंधार कसा तो उरलाच नाही. सगळं सगळं धुवून गेलं. रिती झाल्यें. लख्ख मोकळी. हलकं हलकं वाटलं."

मृण्मयी पान १३१.

"असं वाटलं कीं, माझ्या कपाळावरून कुणी मोरपीस फिरवत आहे. सारी सृष्टीच बदलून गेली. स्वप्नांतील सुख दु:खं भोगीत होते पण दैवयोगानं

जाग आली. अन् आतां त्या सलातला लवलेश उरला नाही.'' मृण्मयी पान १३२.

अशा या अनंताशी एकरूप होत चाललेल्या आणि झालेल्या मनूला मोजता येणार नाही.'एऱ्हवी निर्धारिता नेणिजे सोय जयाची.' मात्र अभिप्राय लेखक कसे वेडे पहा ! ते म्हणतात,'प्रथम भेटींत बंधु भगिनी प्रेमाचं बीज रूजलं.' चित्रकाराचां साक्षात्कार आणि मनूचा अस्वस्थपणा एकाच कोटींत घालतात आणि ते प्रेम-बीज रूजल्याचें चिन्ह समजतात. तें बीज रूजलं का जळालं तें प्रत्यक्षच पहा,—ज्या प्रथम भेटींत असा जीवघेणा परिणाम झाला, अपमानाचं शल्य इतकं खोलवर रूपलं, छाती विंधणाऱ्या बाणांनी इतकी जिव्हारी जखम झाली; तेथे हे महाशय म्हणतात,'प्रेमाचं बीज रूजलं.' चक्रमपणा आणखी काय असूं शकतो? ही अवतरणें पहा—

''मात्र तिला बरोबर घेऊन चित्रकारांना उठवावं. त्यांना सांगावं कीं, सकाळी भेटलात, तेव्हाचं सगळं विसरून जा. आतां मी मानापमानापलीकडं पोहोचले आहे.'' मृण्मयी पान १३१.

''अहो चित्रकार, हे सगळं मी तुम्हाला सांगणार नाही. मुळीच सांगणार नाही. हें सुख माझं मीच

भोगीन. मात्र आतां या शरीररूप निर्माल्याची हवी तितकी चित्रें काढा.'' पान १३१.

ही दोन अवतरणें फार महत्त्वाची आहेत. जी चित्रकारांना मनीचें गूज सांगत नाहीं. उलट निर्भयपणें समोर उभी ठाकते आहे. समस्येला समोरासमोर तोंड देते आहे. तिच्या मनीं बंधु-प्रेम निर्माण झालें असे म्हणणे हे गाजरपारखीपण आहे. आचार्य म्हणतात, ''अज्ञानप्रभवं सर्व ज्ञानेन प्रविलीयते। ''

अज्ञानप्रभव काय आहे? मनूचें चित्रकारांना बागेंत पाहून चपापणें, गोंधळणें, बावरणें; एक क्षणाचीच दृष्टभेट, तीहि पुरती होऊं न देतां चपळाईने घरीं येणे आणि दारीं उभे राहून चित्रकारांनी विचार ल्यावर अत्यंत विव्हळ होऊन अश्रुधारा वहाणें आणि त्यानंतरचें तें प्रदीर्घ स्वगत भाषण. हे सर्व व्यावहारिक दृष्ट्या अतिशय योग्च आणि उचित वर्तन आहे. कुठलीहि मानी मुलगी अशा प्रसंगीं अगदी असेच वागली असती. स्वत्वाचे,स्वाभिमानाचें, जिवंतपणाचें हे चिन्ह आहे. लाचारीने, स्वाभिमानशून्यतेने, मुर्दाडपणें जीवन जगणाराला हा एक आदर्श आहे. मात्र येथे मनूचा पिंड आतां चंडोलाचा आहे. तिने फार उंच भरारी मारली आहे. ज्या गोष्टींना आपण आदर्श म्हणतो त्या मूलत:

अज्ञान प्रभव असतात. यामुळेंच अहंविशेषाच्या आधारावर उभा राहिलेला आदर्श थिटा आहे.‘सायासे पुण्य अर्जिजे। मग संसारू कां अपेक्षिजे।। असा पेंच येथे निर्माण होतो. ही फार उंच स्थिती आहे. चित्रकारांच्या समोर उभा राहण्याचे धाडस कां झालें नाहीं? अपमान-शल्य इतकं खोलवर कां रूपलं? इतकी विव्हळता कां आली? व्यावहारिक भूमिकेवर हा प्रश्नच संभवत नाही आणि त्याचें उत्तरहि त्याच जातीचें असतें. मनूकडूनहि सुरवातीला या प्रश्नाला व्यावहारिक भूमिकेवरून चुकून उत्तर दिले गेले पण ही चूक अल्पावकाशांत तिला उमगली आणि क्षणार्धांत ती कल्पनांतीत सावरली. कुठलाहि प्रश्न व्यावहारिक नसतोच मुळी. तो अध्यात्मिकच असतो पण तसा तो न समजणें हाच व्यावहारिक बुद्धीचा धर्म आहे. समस्या व्यावहारिक बुद्धीने हाताळणाऱ्याला कृष्णमूर्ति कसा चिमटा घेतात पहा—ते म्हणतात, ***You want discipline because there is fear.*** आपला मूळ प्रश्न असा कीं, हें भय कां वाटले? ही विव्हळता कां आली? याचें अध्यात्म भूमिकेवरील उत्तर असे कीं,

तंववरी रे तंववरी बाधी हा संसार
जंव रखुमादेवीवर देखिला नाहीं बाप {बाबारे!}

आत्मदर्शन नाही म्हणून भय आहे. म्हणून विव्हळता आहे. म्हणून मानापमानादी द्वंद्वांचे आघात-प्रत्याघात आहेत. हें आत्मदर्शन, हा आत्मप्रत्यय, ही आत्मनिष्ठा अशी आहे कीं, ही ज्याचे ठायीं बाणेल त्याच्या केसाला ढका लावण्याचें सामर्थ्य विश्वांतील कुठल्याहि शक्तींत नाही. 'अभयं वै जनकं प्राप्तोसि। जनका तूं आतां सर्वतोपरी निर्भय झाला आहेस. हें जनकमिसे अखिल मानवजातीला अभयदान आहे. भयांतून निर्माण होते त्याला 'शासन' म्हणतात. तर अभयांतून निर्माण होते त्याला अनुशासन म्हणतात. अभय म्हणजे निर्भयत्व नव्हें. तो सापेक्ष अर्थ होईल. अभय हें आत्म्याचें स्वरूप आहे. आत्मा द्वंद्वरहित आहे. म्हणून अभय याचा अर्थ 'भयाची अनुपस्थिती'. ज्याने ही भयाची ही अनुपस्थिती अनुभवली—म्हणजे भयाला कधी अस्तित्त्वच नव्हते, अगदी भय वाटत होतें तेव्हांहि—असा जो अभय झाला त्याच्या जीवनांत अनुशासन पर्वाला सुरवात होते. मनूची आतां या स्थितीकडे वाटचाल सुरू झाली. किंबहुना ती पुष्कळसा मार्ग आक्रमून गेली. आतां उलट क्रिया सुरू झाली. ज्याच्यापुढे उभा राहण्याचे ती धाडस करीत नव्हती त्यासंबंधी आतां भयच उरले नाहीं. चित्त निर्भय, निर्विकार

झाल्यामुळें गडबडणें, बावरणें, गोंधळणें संपूर्ण लोप पावले. चित्ताची अवस्थाच पालटून गेली.

निर्भय, निश्चिंत, निवांत, निरार्त ।
रतलेसे चित्त हरीपायीं ।।

भलभलत्या छंदानें उगीच विनोदानेच ती विव्हळत होती हे तिला आतां पूर्णपणें उमगले. 'त्या'एकाशी एकरूप झाल्यामुळें ती एकदमच बदलून गेली. सामान्य जनाहून ती अगदी वेगळी, निराळी होऊन गेली. आत्मसाम्राज्याची स्वामिनी झाल्यामुळें ह्या अशाश्वत देहाचा संबंध संपला. मग मान-अपमान काम-क्रोध हे कोठून उरणार? स्वतःचे ठायीं आत्मप्रत्यय आणि सर्वत्र तीच आत्मप्रतीति 'आदौ ब्रह्माहं अस्मि इति अनुभव उदिते खल्विदं ब्रह्म पश्चात्' अशी अवस्था आतां प्राप्त झाली. अखिल विश्व हें माझेंच रूप आहे यांत निर्भयतेने चरम स्थिती गाठली. 'द्वितीयात् वै भयं भवति' त्यामुळें आतां एकत्वाच्या अनुभूतींत चित्रकारांना भिण्याचें, त्यांच्यापुढे गडबडण्याचें, गोंधळण्याचें कारणच उरलें नाहीं. शाश्वताचा निश्चयो बाणला, अशाश्वताचा संबंध संपला. शरीररूपी निर्माल्याची हवीतेवढी चित्रें काढली तरी आतां त्याचें शुभाशुभ राहिले नाही, उरले नाही तर मानापमान, सुख-दुःख स्पर्शच कसा करूं शकतील? विव्हळता राहीलच कशी! असे हें

स्वानंदामृत अंगप्रत्यंगांत खेळल्यावर तेंच मुखावाटें वाणीच्या रूपाने प्रकट झालें; ती वाक्, ती गिरा म्हणजे " दादा " दादा म्हणजे बंधु-प्रेम. अभिप्राय लेखक महाशय!, तुम्ही तळांत उभे राहिलात. तिथेच बसा. तेंच तुमचें निवासस्थान. तुम्हाला उंचावरील हवा सोसणार नाही. यांत तुमचाहि कांहीं दोष नाही म्हणा ! मात्र............

आमच्या उंच ठिकाणीं 'दादा' हा शब्द अभयाचा प्रतीक आहे. चित्ताच्या द्वंद्वरहित निर्विकार अवस्थेचा द्योतक आहे. येथे प्रेम आहे असे नव्हें, तर प्रेम,प्रेम आणि प्रेमच आहे आणि त्याची जातहि वेगळी आहे " जो प्रियूची प्राणेश्वरी " किंवा

मी आत्मवैभवानें माझ्यामधेचि डोले।
माझेंचि सर्व झाले, माझ्यामधे मिळाले।।
माझें मलाचि शोभे, माझें मलाचि लाभे।
माझ्यामधेचि डोले, तें माझियाचि लोभे।।

असे प्रेम आहे. असा लोभ आहे. अशा प्रकारचे जीव लावणें आहे की, जे भावाला देखील अखेरपावेतों नीटसे उलगडले नाही. चित्रकरांचे हे उद्गार पहा—

"तें दिवशीं तुमचं चित्रं काढू गेलो, तर तुम्ही घाईघाईनें आंत कां पळालांत आणि दुसरे दिवशी हवी तितकी चित्र काढायची परवानगी कां

दिलीत ते मात्र माझ्या ध्यानीं आलं नाही पण मी तें तुम्हाला विचारणार नाही. अमर्यादा होईल.'' मृण्मयी पान १४६. आणखी एक अवतरण पहा—

''एक सांगतो, जिथं तुम्ही आहांत, तिथंवर माझी कल्पनाही पोचूं शकत नाही मनूताई ! ज्याचा पदर तुम्ही धरला आहांत तो तुमचं संरक्षण करायला समर्थ आहे. त्यानं तुमच्या मस्तकी शंखाचा स्पर्श केला आहे ! येतो.'' मृण्मयी पान २४५,२४६.

अभिप्राय लेखकाच्या बुद्धिमान चित्रकार बंधूंना जें ध्यानीं आलं नाहीं तें इतर सामांन्यांना थोडेच कळणार आहे! हे एक अवतरण पहा—

''तिनं म्हटलं,'मनूताय, आज इतली खुशी कशाची?' तिच्याकडं पहात म्हणाले, 'काकी, खूष व्हायला मुहूर्त थोडाच पहावा लागतो तुमच्या सारखा. तिनं कूस बदलीत म्हटलं, 'अशाच खूस असा जी! आपल्या घरीं सुकानं नांदा! भरताराचं घरानं उजळ करा!' म्हणणार होते कीं, मी भ्रतार केला आहे. त्याचं घराणं सदैव प्रकाशमय असतं! पण तिला तें कळलं नसतं.''

अशा भूमिकेवरील मनूचें प्रेम, तिचा लोभ, तिचा सर्वत्र जडलेला जीव, तिने सर्वत्राशी जोडलेलें नातें समजण्यास सर्वांनाच अवघड गेले आहे. या नात्याला कंटाळा कसला तो ठाऊकच नाही. सारखं

राबत राहणार. अंगी टॉवेल साबणासहित स्नानाची तयारी करणार. झोपतेवेळीं सुंदर बिछाना घालणार, व्यवस्थित स्वच्छ. उशाला पाण्याचा तांब्या अन् मोगरीची चार फुलंहि. असं हें नातं विश्वांत सर्वत्र अत्यंत नेटकी, देखणी, नयनमनोहर सेवा करीत राहणार. वरच्या आतिथ्याला भुलला तो मूळ वस्तूला मुकला. उपनिषदांत एक दृष्टांत आहे, नगारा वाजवितो त्याला पकडा म्हणजे सगळे ध्वनि तुमच्या हातीं येतील. त्याप्रमाणे येथील आतिथ्य नको मात्र यजमानालाच पकडा म्हणजे मूळ उगमासह प्राप्त झालेलें आतिथ्य तुम्हाला जीवनाचें यथार्थ आणि पूर्ण दर्शन करून देईल.

‘ तयाचे बिसाट शब्द। सुखे म्हणो येती वेद ’ किंवा ‘यास्तेषां स्वैरकथाः ताऽएव भवन्ति शास्त्राणि। आत्मनिष्ठांच्या स्वैर वर्तनाचे लौकिक अर्थ घ्यायचे नसतात. ते शास्त्रीयच घ्यायचे असतात. भगवद्भक्ताने ज्याला ज्याला स्पर्श केला, त्याचें दिव्य रूपान्तर होऊन जातें. अर्थात् हे शब्दांच्या बाबतीतहि समजायचे. ‘दादा’ हा शब्द आत्मीयतेचा वाच्य आहे म्हणजेच तो ईश्वराचा वाच्य आहे. सोप्या भाषेंत तें ईश्वराचें नांव आहे. ईश्वराला आणखीन कोण कोणती नांवें आहेत! ‘‘पिताऽहमस्य जगतो धाता माता पितामहः।’’ दादा, मामंजी,

सासूबाई, आपण— पति, बाबू—ही सर्व ''त्या''चीच नामाभिधानें आहेत. इतक्या रूपानें ती'त्या'ला गाते आहे, आळविते आहे, 'त्या'ची सेवा करते आहे.

ज्याला आपण जीवन समजतो तें जीवन नव्हेंच. उपमन्यू, पाण्यांत कालवलेलें पीठ, दूध म्हणून पीत होता. त्यालाच तो दूध म्हणे! दूध म्हणजे काय हे त्याला बरेच दिवसांनी कळले. आपलेहि तसेच आहे. ज्याच्या आदि-अंतीं जन्म-मृत्यू आहे, त्याला कां जीवन म्हणता येईल? ज्याचा अंत मृत्यूंत आहे, तें जीवन नाहीं; ती मृत्यूचीच एक दीर्घ प्रक्रिया आहे; भले ती ५० वर्षांची असो नाहीतर १०० ची. आपण म्हणतो, जन्म झाल्यावर जीवनाची सुरवात होते. हा भाषेचा फारच सैल प्रयोग आहे. प्रत्यक्षांत जन्म झाला कीं, एक एक दिवसाने मृत्यूकडे वाटचाल सुरूं होते. आपण रोज प्रतिदिनीं एकेका दिवसानें मरतच असतो. वयाच्या पंचविशीपर्यन्त ही गोष्ट ध्यानीं कां येत नाही? तर आपण फार थोडी वाटचाल केलेली असतें आणि अजून पुष्कळ शिल्लक असते. त्यामुळें ती जाणीव होत नाही आणि आपण जीवन जगत आहोत अशा भ्रमांत राहतो. वास्तवात व्यय झालेली पंचवीस वर्षे जीवनाची वाटचाल नव्हें तर मृत्यूकडे केलेला तो प्रवास ठरतो. ज्याला जन्म

आहे त्याला मृत्यू असणारच; ते अमर कसे असूं शकेल?

दिवस उगवला पुन्हां मावळे, अस्तापाठी उदय।
रितेचि भरतें, भरलें सरतें, हा सृष्टीचा न्याय।।

मृत्यूच्या साम्राज्याखालील जीवन किती भयानक वस्तू आहे याची समर्थांना जाणीव झाली म्हणून ते शुभमंगल करून सावधान होण्याच्या भ्रमांत राहिले नाहीत. अगोदरच सावध झाले.

आपल्या जीवनाची सर्व द्वारका 'अहं'वर उभी असते. शरीर विनाशीच आहे. आणि आत्मा तर अमर आहे. तेव्हां मृत्यू हा 'अहं' जीवनालाच असतो. कारण अहं हा देहाबरोबरच जन्मतो आणि देह नाशांतच त्याचा विनाश होतो. आपला सर्व जीवनानुभव देहाहंकाराचाच असतो त्यामुळें त्याची अखेर परिणती मृत्यूतच होणार हे उघड आहे. आत्मजीवन हेंच खरे जीवन आहे. पण हें जीवन लाभण्यासाठीं आत्मप्रत्यय पाहिजे. आम्हाला सदैव जो अनुभव असतो तो 'अहं' प्रत्ययाचा. जसजसा अहं विलीन होत जातो तसतसा आत्मप्रत्यय उदित होऊं लागतो. या प्रत्ययानंतर जें जीवन लाभतें त्याला आत्मजीवन म्हणतात. तें नित्यउदित आहे. त्याला मावळणं माहीत असत नाहीं. येशूख्रिस्ताने त्याला ***Eaternal Life*** म्हटले आहे. अज्ञान अंधार

नष्ट झाल्यावर मनूला अशा आत्म-जीवनाचा लाभ झाला. तिचें जीवन अशाप्रकारें संजीवित कसे झाले?

आपल्या जीवनांत विविध समस्या असतात. या समस्या खरेतर जीवन प्रदान करण्यासाठीं येत असतात. आणि नेमके हेंच आमच्या ध्यानीं येत नाही. आम्ही उलट्याच मार्गानें वाटचाल करतो. एकतर आम्ही त्या समस्येपासून पळ काढतो, अथवा तिला प्रतिकार करतो म्हणजे शास्त्रीय भाषेंत तिला बळी पडतो. दोन्हीं बाजूंनी प्रगती कुंठीत होते. तिचा सर्वतोपरी स्वीकार करणें म्हणजेच समस्येला समोरासमोर {***Encounter*** }जाणे होय. यासाठीं प्रथम एक तटस्थता हवी असते. नंतर साक्षित्व. आणि तें मुरल्यावरच जीवन सामरस्य प्राप्त होते. 'दादा' हा शब्द आणि मनूचें वर्तन ह्या सामरस्याची अनुभूति आहे. ही अनुभूति आपण बाजूस झाल्याशिवाय शक्य नाही. ''कृपा करिये और हटिये अशी त्याची परिभाषा आहे. यामध्यें भोग, आसक्ति, अहंकार यांचा आत्यंतिक उपरम झालेला असतो म्हणजे त्यांना कधी अस्तित्त्वच नव्हतें—अगदी भोग कालींहि—याचा प्रत्यय येतो. मग भोग हा भोग रहातच नाही.''भोगीं झाला त्याग। गीतीं गातां पांडुरंग।।'' अशी अवस्था प्राप्त होते. मग जीवनाचा

बोजा वाटत नाही. तें जगत असतांहि एका विलक्षण मुक्ततेचा अनुभव येतो. जीवन हलके-फुलके वाटतें. ते आनंदाचें आवारूं होतें. याची ही एक चुणुक पहा—

" सारी सृष्टीच बदलून गेली..................

......................पण तिला तें कळलं नसतं."

मृण्मयी पान १३२ ते १३६.

आतां व्यावहारिक भूमिकेवरून कांहीं विवेचन करतो. परक्या मनुष्याला आत्मीयतेच्या भावनेंतून काय म्हणता येईल? हे अभिप्राय लेखकाने सांगावे. येथे अध्यात्माचा प्रश्न नाही. ही अगदी व्यावहारिक गोष्ट आहे. चित्रकारांना मनूने आपलेपणाच्या भावनेने दादा म्हटले. ही एक उच्च जीवन-रीत आहे. मात्र या महाशयांना तेथे लगेच बंधु-प्रेमाचा साक्षात्कार झाला आणि त्यांनी कृष्ण-दौपदीपर्यन्त मजल मारली वास्तविक चित्रकार रूप, प्रतिष्ठा, संपत्ति, लौकिक गुण यांत कितीहि श्रेष्ठ असले तरी 'समानशीले सख्यम्' या दृष्टीने बंधू मानण्यास कांहीं समान सूत्र आहे कां? चित्रकार मनूसारखे धरती विषयीं अपार जिव्हाळा असणारे, 'त्या'शी जवळीक केलेले असे असते तर 'तुष्यन्ति च रमन्ति च' या न्यायानें जिव्हाळ्यापोटीं बंधु-भगिनी नातें निर्माण झालें असतें.

असे कांहीं समानसूत्र आहे कां? याचा अर्थ मनूने चित्रकारांना भाऊ म्हणूनच मानले याचा सबळ पुरावा कोणता तो आम्हाला दाखवावा.

चित्रकार तसे समजतात, बंगल्याला तसे वाटतें म्हणून आम्हीहि तसेच म्हणायचे काय? आम्हाला वरील दोघांचीहि बाजू घ्यायची नाही. मनूची बाजू घेऊन आम्ही लिहिण्यास बसलो आहोत आणि तीच कादंबरी लेखकाची बाजू आहे अशी आमची मनोमन खात्री आहे. रावणाची बाजू घेऊन रामायण लिहिणारे महाभागहि या भारतवर्षांत निर्माण झाले आहेत. त्यांनी किती हिडीस प्रकार केला आहे ते बोलावेसे आणि लिहावेसे वाटत नाही. अभिप्राय लेखकाचें कथन सोज्वळ असले तरी ते ह्याच वर्गांत मोडतात.

आतां याबाबत मनूची भूमिका काय आहे? चित्रकार जें समजले त्याला विरोध करण्यासारखे विशेष कांहीं नव्हते. म्हणून तिच्या अंतरीहि तेंच आहे असे समजायचे काय? मला बहीण म्हणून म्हणता ना? ठीक आहे. मी तुमची ताई, तुम्ही माझें दादा. मोठी माणसे तात्त्विक मुद्यावर आग्रह धरतील पण किरकोळ गोष्टींत ती संपूर्ण निराग्रही असतात. ती अंतरीं दृढ आणि परमार्थरूपीं गूढ असून बाह्य व्यवहारांत लोकरूढी प्रमाणें वागणारी असतात.

‘मुलाच्या चालीने चालावे’ किंवा ‘अर्भकाचेसाठीं पंतें हातीं धरिली पाटी’ असा न्याय असतां त्यांच्या या वागण्यांतील मर्म न ओळखणें हें विचारशीलतेचें लक्षण होईल काय?

वास्तविक अशा व्यक्तींना नातें नसतें. त्यांना नात्यागोत्यांत अडकवून आम्ही आमची क्षुद्र मनोवृत्ति प्रकट करीत असतो इतकेच. अशी माणसे कोणाची कोणी नसतात तरी ती सर्वांची असतात. “तुका म्हणे जें जें बोला। तें तें साजे या विठ्ठला।।” असे तिच्या संबंधी कितीहि म्हटले तरी तें अपुरेच आहे. मनू अखेर मनूच आहे—कांहीं आगळी,वेगळी,निराळी

तिला कोणी बहीण समजतो. कोणी म्हणतो सून आहे. दुर्गा तिला सखी मानते. आणि तिची आई तिला मुलगी म्हणते. ती सगळ्यांना एकजात सारखाच जीव लावते. कोणावरहि इतरापेक्षां विशेष प्रीति असल्याचें पुसटहि दर्शन नाहीं. मग उपटसुंभा-सारखा त्यांतील एकच संबंध उचलून तेंच कादंबरीचें प्रतिपाद्य ठरवायचे आणि त्याविषयीं कादंबरी लेखकाचें विनाकारण अभिनंदन करायचे हा कुठला न्याय?

अशा रीतीने मनू सर्वांची आहे पण तिला विचारा बरे तूं कुणाची कोण आहेस तें सांग म्हणून? येथे तिच्याविषयीं दुसरें कांहींहि म्हणोत,

तिच्या स्वतःच्या भूमिकेचा प्रश्न निर्माण होतो आहे. तिची जीवनांतील भूमिका कोणती? माझ्या मतें एकच आहे.

## ती ‘त्या’ ची आहे बस् !

## हेंच वेदान्ताच्या भाषेंत बोलायचे झाल्यास—

नाऽहं मनुष्यो न च देव यक्षो।
न ब्राह्मण क्षत्रिय वैश्य शूद्रः।
न ब्रह्मचारी न गृही वनस्थो ।
भिक्षुर्नचाऽहं निजबोधरूपः ।।

प्रपंच आहे, जगांतील बंधनें पडली आहेत म्हणून जीवनानें निराळे वळण घेतले. नाहीतर उघड्या आभाळाखाली उन्मुक्तपणें विहार करणारा हा एक राजहंस आहे. आप्पांना मी असेच समजतो. आणि यामुळेंच त्यांच्या आत्मीय विशेषांचें प्रतिबिंब असलेली मनू मी लौकिकार्थाने स्वीकारणे केव्हांहि

मान्य करणार नाही. यांत साहित्यिक म्हणून त्यांच्या एखाद्या गोष्टीला तडा गेला तरी हरकत नाही. उलट असे झाल्यास मी टाळ्या वाजवीन आणि म्हणेन, येथे साहित्यिक संपला आहे आणि आत्मज्ञ उदय पावला आहे.

मनूची ही परमोच्च भूमिका आहे. आतां तिचें जें जें वर्तन होईल तें तें साजिरे, गोजिरे, उदात्त, आदर्श, नैतिक असेच होणार. जरी तें एखादे वेळीं सामाजिक बाह्य पद्धतींत बसणारे नसले तरी त्यामुळें आंतरबैसका लवमात्रहि कलुषित होत नाहीं. ती सदैव अकलंकित असते आणि राहतेहि. तिच्या दिव्यतेची दीप्ती लेशमात्रहि कमी पडत नाही.

कृष्ण तर परमात्माच आहे आणि राधा बोधाच्या उंच भूमिकेवर आहे. असे असले तरी जनरीत, परंपरा, लोकाचार, रूढी या दृष्टीने पाहतां आपला पति ‘अनया’ असतांना कृष्णाशीं तिचा कोणत्याहि स्वरूपाचा झालेला व्यवहार असो, तो समर्थनीय ठरूं शकत नाही.कारण असे मानलें जातें कीं,यद्यपि शुद्धं लोकविरूद्धं नाकरणीयं नादरणीयम्। भागवतकारांनी अथवा हरिवंशपुराणकारांनी त्यांतींल दिव्यत्वाचें निरूपण केलें. आचाराचें समर्थन नाहीं.

मनूचें वर्तन म्हणजे तिचा तो प्रारब्धप्राप्त व्यवहार आहे एवढेच म्हणता येईल. प्रसंगीं

मनूऐवजी दुसऱ्या एखादीच्या बाबतींत आदर्श न ठरतां त्याज्यहि ठरेल. नैतिक न दिसतां अनैतिक असल्याचे सिद्ध होईल. हें त्या त्या व्यक्तीच्या प्रकृतीवर आणि त्या त्या वेळेच्या समाज-स्थितीवर अवलंबून राहील. ‘‘पिसे नेसलें कीं नागवे हें लोकी येवोनी जाणावे’’ हा असा विकल्प तुम्ही आम्ही करायचा. त्याचा त्याच्याशीं कांहीं संबंध नाही. तो वेगळ्याच स्थितींत आहे. मनूचा कुठलाहि व्यवहार अंतरीं विशिष्ठ धोरण ठेऊन घडत नाही. म्हणजेच तो बुद्धिपुर:सर अर्थात् तो वासनात्मक नाही. बहुविध प्रेरणा हाच तिच्या जीवनाचा Motivation आहे. यामुळें तिच्या व्यवहाराचा जो एक Pattern तयार झाला आहे; तोहि तिच्या प्रकृतीला अनुसरून आहे. ‘‘सदृशं चेष्टते स्वस्य: प्रकृते: ज्ञानवान् अपि’’-गीता. प्रकृतीला प्राधान्य द्याल तर मनू कळणार नाही. आणि मनू कळली नाही तर कादंबरीचें मर्म, रहस्य, प्रतिपाद्य केव्हांहि हातीं येणार नाही. येथील मनू लौकिक सृष्टींतील नाही. तिला नात्यागोत्याच्या बंधनांत घालून तिचें स्वरूप पाहूं जाल तर अशांना आम्ही बावळे समजूं. राम-भरत, कृष्ण-द्रौपदी ही मधुर नीतीची उदाहरणें आहेत. परंतू मनू हें अतिनैतिक दिव्य अध्यात्मशास्त्र आहे. येथे नीति-

अनीतीचें, उदात्त-आदर्शाचें विवेचन करणाराला, तो अजून खालच्या पायरीवर उभा राहून बोलणारा आहे असेच म्हणूं.

मनू ऐवजी भिन्न प्रकृतीची सोनू असती आणि चित्रकाराऐवजी एखादा मूर्तिकार असतां तर हा संबंध प्रियकर-प्रेयसी म्हणून राहिला असता आणि हे लोकविरूद्ध झाल्यामुळें याविषयीं आम्ही शिव्याशाप दिले असते तरी सोनूच्या प्रकाशयुक्त ज्ञानमय आंतरस्थितीपुढे तिच्या या व्यवहाराविषयींचे नीति-अनीतीचे तर्क-वितर्क पार लुळे-पांगळे पडले असते. आणि मग निमूटपणें मान्य करावे लागले असते कीं, हें अद्भुत असून हृद्देश एका दिव्यतेने प्रकाशमान करणारे आहे.

वास्तविक हें असें लिहिण्याची जरूरी नाही. परंतु अथांग, अपार असणारी मनू, तिला अभिप्राय लेखक आपल्या तोकड्या तार्किक फूटपट्टीनें मोजण्यास निघाले आहेत. आणि त्या मापनांतून ते कादंबरी लेखकाचें अभिनंदन करू पाहतात. अर्थात् हें ध्यानीं यावे म्हणून मी हें वाकडे वळण घेतले.

भावनेच्या उन्नयनाची त्यांनी चर्चा केली आहे. पण त्या उन्नयनाची दिशा व स्वरूप याचें त्यांना काडीचेहि ज्ञान नाही. ‘‘जन्म घेणे लागे।

वासनेच्या संगे। तेचि झाले अंगे। हरीरूप।। याला संपूर्ण मानवी जीवनाचें उन्नयन म्हणतात. हीन वासना जाऊन उदात्त वासना आल्या तर त्याला उन्नयन म्हणत नाहीत. ‘वासनेचें बीज जळोनी जाय’ हें खरे उन्नयन आहे. मग प्रश्न असा निर्माण होतो कीं, त्याला भावभावना नसतात का? आम्ही त्या नसतात असे कुठेहि म्हटले नाही. येथली गोम वेगळीच आहे. त्याची प्रकृतीच ज्ञानमय असते. तदनुसार तो वागत असतो. त्यांत लाचारीचा प्रश्न नाही. कारण त्याच्या भावभावना ज्ञानाचा सहजाविष्कार म्हणून असतात.‘सहज बोलणें हित उपदेश’ हें अशाहि रीतीने मांडता येते— मुक्त पुरूष तीर्थयात्रा करूं शकतो का? उत्तर—तें सांगता येत नाही पण तो चालूं शकतो. तो व्याख्यान देत नाहीं पण बोलूं शकतो. त्याच्या सर्व क्रिया बेसिक स्वरूपाच्या असतात. मनू चित्रकारांना भाऊ मानते का? सांगता येत नाही पण ‘दादा’ म्हणूं शकते, ‘पाठीराखा’ म्हणूं शकते. आणि या गोष्टींचा तिच्याशी संबंध पोचूंच शकत नाही, इतक्या लांब ती उभी आहे. वेड्याने कुणाचा खून केला काय अथवा कुणाला दान दिलें काय, दोन्हींहि क्रियांचें पाप-पुण्य त्याला लागत नाही. कारण त्याला फक्त वेड लागलेलें असते. मुक्त व्यक्तीचें ज्ञान हेंच लक्षण. क्रियेवरून

त्याचें अनुमान करायचे नसतें. असा जो ज्ञानरूप होऊन जातो त्याचें संपूर्णच उन्नयन होतें. तो ज्ञानी होत नाहीं तर तो ज्ञानरूपच होऊन जातो. ज्ञान आणि ज्ञानी असा भेद तेथे नसतो. 'एवं वस्तूसी जाणो जातां। जाणणेंचि वस्तू तत्त्वता। मग जाणणें आणि जाणता। कैसा उरे।। 'ब्रह्मवित् ब्रह्मैव भवति।' ज्ञानी म्हणजे स्वयमेव ज्ञान च. त्याचें वर्णन करतांना ज्ञानदेव म्हणतात, ''तें चालतें ज्ञानाचें बिंब। तयाचे अवयव तें सुखाचे कोंभ। येर मानुसपण तें भांब। लौकिक भागु।। मनुष्यपण ही भ्रांति आहे आणि म्हणूनच हा लौकिक विभाग आहे, गौण आहे, नैमित्यिक आहे. त्यामुळें हा मुख्यार्थ समजणे ही भ्रांति आहे आणि हेंच या कादंबरीचें रहस्य आहे.

मस्तकाच्या वरच्या भागाला ब्रह्माण्ड म्हणतात. आणि खालच्या भागाला पिण्ड म्हणतात. सहस्रारांत म्हणजे ब्रह्माण्डांत शिव आहे आणि हृद्देशांत म्हणजे पिण्डांत जीव आहे. पिण्ड-ब्रह्माण्ड-स्थित जीव-शिवाचें अनादी-नित्यसिद्ध-ऐक्य अनुभूतींत येणें हें मानवी जीवनाचें ध्येय आहें. हें ऐक्य, हें मीलन, हें सामरस्य म्हणजे हृदयांत आविष्कृत होणारा दिव्य आत्मबोध होय. हा बोध, हें ज्ञान दृष्टा-दृश्य-दशेच्या अतीत केवळ दृङ्मात्र असणारें, त्याचेच बाह्य प्रकाशन म्हणजे मानवी जीवन आहें. ज्ञानदेव

म्हणतात— घडियेचेनि आकारें। प्रकाशिजे जेवी अंबरें। तेवी विश्वस्फूर्ति स्फुरे। स्फूर्तीची हें।। काय अद्भुत पहा! ज्ञानदेवांच्या ह्या ओव्या एकमेकींना मिठ्या मारीत अतिलगबगीने जणूं मराठीच्या प्रांगणांत उतरत आहेत. आत्मबोध अतिदुर्लभ म्हटला जातो. खरेहि आहे तें. 'मनुष्याणां सहस्रेषु' मात्र तो आपल्या परसदारीं जणूं पाणी भरतो आहे असे वाटते.''ज्ञानराज माझी। योग्यांची माऊली। जेणे निगमवल्ली। प्रकट केली।।

आपला मूळ चाललेला विषय असा कीं, ही ज्ञानदशा, हा अध्यात्मभाव आणि यांतून आविष्कृत होणारा मानवी जीवन-व्यवहार हा आदर्श, उदात्त, नीतियुक्त असला तरी त्याला नीति म्हणतां येणार नाही. सूर्याचें ठायीं अंधाराचें नांवच नाही मग तेथे प्रकाशाची काय मातब्बरी? अंधाराच्या सापेक्ष असणारा प्रकाश ! ही आमची कल्पना आहे. सूर्य दृष्टीमध्यें ती निःसंशय चुकीची आहे. अनर्थकारी आहे. सत्ताशास्त्राच्या दृष्टीनें सूर्यदृष्टि हीच सत्य आहे. आणि आमची दृष्टि? आम्ही बुद्धिवादाचे कितीहि ढोल बडविले तरी, कल्पित आहे. कल्पित सृष्टि खेळण्यासारखी वापरावी. ती खोटी नाही हें नक्कीच कारण ती मन-बुद्धीला प्रत्यक्ष प्रतीत होते. पण ती खरीहि ठरूं शकत नाही. कारण

वस्तुस्थितींत तिचा बाध होतो. म्हणून ती कल्पित. आणि याचा अंतीम अर्थ ती कल्पित असल्यामुळेंच आत्मरूप आहे. ''माझिया विस्तारलेपणाचेनि नांवें। हें जगचि होय आघवे।। अथवा कां बीजचि झालें तरू। भांगार चि अलंकारू। तैसा मज एकाचा विस्तारू। तें हें जग।।''

ही उंच, दिव्य आणि अद्भुत स्थिती आहे. येथे सगळे तर्क वितर्क पांगळे पडतात. 'द्वैताद्वैत विवर्जिते समरसे मौनं परं संमतम्।' असे होऊन जाते. ही स्थिती अनुभवगम्य आहे. शब्दांत, तर्कांत किंवा कल्पनेंत ती मावणारी नाहीं. म्हणून संत म्हणतात, 'मौन गा तुझें राशीनाम।'

या स्थितींतून आविष्कृत झालेल्या जीवन-व्यवहाराला, तो नैतिक आहे असे म्हणणे म्हणजे त्याचे अवमूल्यन करणे होय. त्याच्या श्रेष्ठत्वाचा तो अवमान आहे. सामान्य नीति कितीहि उच्च असली तरी ती अनीतीच्या सापेक्षच प्रकट होत असते. ही तशी नाही. ही सहजस्फूर्त अशी अतिस्वाभाविक अवस्था आहे. यामुळें तिला नैतिक म्हणणे, हा तिचा गौरव न ठरतां अमर्यादा, अविनयाचा दोष येतो. एखाद्या जीवन्मुक्ताचा बाह्य आदर्श, उदात्त, नैतिक व्यवहार आणि राम-भरत, कृष्ण-दौपदी यांचा व्यवहार हा बाह्यत: जरी समान दिसत असला तरी

आंतरभूमिकेंत, आंतरबैसकेंत जमीन-अस्मानाचें अंतर असतें आणि हें जें अंतर आहे, ही बहुता सुकृताची जोडी आहे. हे दुर्मिळ आहे. अनन्ताजन्मीचें पुण्य असेल तरच हें भाग्य वाट्याला येतें. गुणगान या गोष्ठीचें करावयास हवे. अशी अलौकिक सहजासहजी न दिसणारी दुर्मिळ, दुर्लभ मनू चित्रित केल्याबद्दल लेखकाला धन्यवाद द्यावयास हवेत. ह्या ठिकाणीं त्यांचें अभिनंदन केले तर त्यांच्या श्रमाचें खरोखर चीज झाले असे होईल. त्यांना अतिशय समाधान वाटेल.

कसे नवल आहे पहा! स्वत:च्याच कादंबरींतील कांहीं श्रुतिमनोहर उतारे वाचीत असतां त्यांचे नेत्र पाणावले, खळ्कन अश्रुबिंदु ओघळले; त्याची आम्हीं कांहींच दखल घेऊं नये काय? आणि तशी ती घेणार नसूं तर एक गोष्ट अगदी निर्विवाद आहे कीं, ही कादंबरी हातांत घेण्यास आणि लेखकाने ती भेट म्हणून देण्यास आम्ही अपात्र आहोत.

आतां बहिरंग परिक्षणाच्या दृष्टीने पाहिले तरीहि अभिप्राय लेखक ज्याविषयीं कादंबरींतील मोहक भावबंध, अभिनंदनीय भाग म्हणून लेखकाचें अभिनंदन करूं गेले आहेत, तेथेहि त्यांची फसगत झाली आहे. कशी ती पहा— मनू आणि दादा

यांच्यातील भावबंध मोहक आहे हें मान्य. पण याहिपेक्षां मनू-मामंजी हा संबंध अधिक सरस आहे. याच संबंधाने प्रथमपासून माझ्या मनाची पकड घेतली आहे. कादंबरीच्या शेवटीं जणूं ते तुलनेसाठीं एकत्र मांडावेत इतके ते एकत्र गुंफले गेले आहेत. त्यामुळें त्यांतील सरसत्व नकळत वाचकांच्या मनावर ठसते. ''असुवन जल सिंच सिंच प्रेमबेल बोयी'' मनू मामंजीसंबंधी वाचतांना कंठ दाटून येतो, अश्रुधारा वाहूं लागतात. मानवता म्हणजे काय? मनुष्य प्रेम कसे असतें त्याची ओळख पटते.

तरूण वस्तूचें स्वाभाविक असे आकर्षण असते कीं, तरूण तरूणी एकमेकांना मिठींत घेतील किंवा एकमेकांच्या पायावर डोकेहि ठेवूं शकतील परंतु म्हातारी आणि त्यांतहि आजारी, लुळी, पांगळी खरोखर तिरस्कारास पात्र ठरणारी असतात. अशा ठिकाणीं मोहक भावबंध निर्माण करणें, या ठिकाणच्या आदरातिथ्याचें मनोहर, सुरेख चित्र उभे करणें हीच खरोखर मधुर कलाकृति आहे. आणि हीच गोष्ट नि:संशय अभिनंदन करण्याजोगी आहे.

मनू मामंजीचं कसं प्रेम ! कसा जिव्हाळा! केवढी आत्मीयता! एकमेकांना कसं जीव लावणं! किती अतूट संबंध ! यापुढे चित्रकारांचा संबंध फिका वाटतो. मला या संबंधात फार मोठी उत्कटता

जाणवली. या संबंधाधारें कादंबरी लेखकाला वाचकाशीं कांहीं हितगुज करायचें आहे, असे दिसून आले. यामुळें उपासनेच्या बाह्य फलश्रुतींत या संबंधाला मी अग्रक्रम दिला आहे.

मनूच्या मनीं धरित्रीविषयीं अपार अपार आहे. हें धरित्रीचें वेड काय आहे? हें एका शब्दांत मांडता येणे शक्य आहे. आणि तें तसे मांडले गेले म्हणजे सगळे गुंते उकलूं लागतात. ही जीवन विषयक एक वेगळी दृष्टि आहे. ही दृष्टि, हा एक शब्द म्हणजे 'उपासना'. मनूचें धरतीचें वेड हें वेड नसून ती तिची उपासना आहे. तिला ती कुलपरंपरेने लाभली आहे. तिच्या विधीविधानासह तात्यांनी ती तिच्या हवाली केली आहे. उपासनेचा फार मोठा आश्रय असतो. ती नसेल तर निराश्रय होण्याची वेळ येते. आणि असे घडले तर केवढाहि मोठा व्याप केला तरी जयाचें नांवहि शक्य होत नाही. आधी तें करावे कर्म। आणि त्या कर्ममार्गे उपासना।। उपासनेसाठीं वेगळे कांहीं करावे लागत नाही. तें कर्मच उपासना होऊन जाते आणि विशेष असा कीं, ही उपासना सांग-सफळ होण्यासाठीं ब्रह्मस्थानीं प्रस्थान ठेवावे लागतें.

मनू हळूंहळूं 'त्या'शी एकरूप होत चालली आणि इकडे धरती तिचा जीव की प्राण झाली.

आकाश कोसळले, ब्रह्मगोळ भंग पावला तरी आतां ती तिचीच वास पाहणार होती. तेव्हां कर्म, उपासना व ज्ञान ही परस्पर पूरक असल्यामुळें या तिन्हींच्या पूर्णतेंत जीवन धन्य होतें.

आतां या उपासनेची बाह्य फलश्रुती काय आहे असे विचाराल, तर ती विश्वपाळिती होते; ही होय. निरंजनापैलीकडे नेऊन घालणें हें तर तिचें मुख्य कार्य. परंतु 'विश्वाचें पालन' हा तिचा बाह्य अनुषंगिक परिणाम आहे. मनूची धरतीची उपासना सगळ्यांच्या भल्यालाच कारण झाली आहे. तिने कोणाचेहि थोडेसुद्धा अहित केले नाही हें सहज दाखविता येईल.

१ कुलपरंपरा सांभाळल्यामुळें पुत्राप्रमाणें उभय ऋण फेडले. आणि पुत्र-कर्तव्य पार पाडले.

२ स्थळाविषयीं आणि लग्नाविषयीं कसलीहि आवड-निवड न दाखविल्यामुळें पैचा खर्च न येतां आईचा केवढा मोठा भार चट्कन दूर झाला! नाहींतर अशा पडत्या काळांत त्या माऊलीनें कशाच्या आधारावर हा शिरावरील भार दूर करावा? अर्थात् या घटनेनें आईला फार मोठे सुखी केले. तिची चिंता-काळजी चुटकीसरसी पुसून टाकली.

३ मनूच्या या आणि इतरहि आश्चर्यजनक घटनेंमुळें सुखोपभोगांत लोळत राहणाऱ्या इजारदारांचा जावई व दुर्गा यांच्या जीवनांत क्रान्ति घडून आली. चार लोकापेक्षां किती निराळी ही व्यक्ति! हें काय आहे बरें ! असे वाटून यावर त्यांना पन्नासवेळा डोके खाजवावे लागले आहे. हें त्या दोघांचें जीवन ढवळून निघाल्याचें चिन्ह आहें.

४ आणि सरतें शेवटी,

मुलगा व बायको यांच्या धटिंगणशाहीमुळें आणि आपल्या जीवघेण्या आजारामुळें लुळापांगळा झालेला, एका कोपऱ्यांत पिचत पडलेला एक देवमाणूस ! मामंजी, त्यांच्या जीवनांत केवढे मोठे चैतन्य ओतले गेले ! जणूं त्यांचा पुनर्जन्मच झाला. आतां ते तेंच जीवन नवीनपणें जगूं लागले. त्यांच्या आशा-आकांक्षांना नवें अंकूर फुटलें. मनूच्या रूपें भगवंतानेच त्यांच्या जीवनांत प्रवेश केला. निस्तेज होऊन निर्माल्यवत् झालेल्या एका देवमाणसाला नवजीवन प्रदान करणें ही मनूच्या धरतीच्या उपासनेची सर्वांत मोठी फलश्रुती आहे.

मामंजीचे हे उद्‌गार पहा—

‘‘माझा निर्वंश झाला,याचं मला मुळीच दुःख नाहीं. हीनं आमचं कूळ धन्य केलं.’’

मनू-मामंजी हा संबंध कसा निर्मळ, पवित्र, उदात्त आहे ! चित्त प्रसन्न करणरा, हृदय हालवून सोडणारा, अश्रू वाहण्यास लावून अंतर हलके करणारा आहे.

याच व्यावहारिक दृष्टीने पाहतां, धरतीविषयीं जिव्हाळा आणि चटका लावणारं खोल भावनिक हृदय हीं वैशिष्टें असलेलें मामंजी, चित्रकारापेक्षां अधिक जवळचे आहेत. मग जिव्हाळा कोठे अधिक असणार हे कोणीहि सहज सांगूं शकेल. आणि जेथे जिव्हाळा जास्त त्या संबंधांत उत्कटता, उदात्तता, मोहकता केव्हांहि जास्त. आतां सांगा मोहक भावबंध कोणते ते? आणि कादंबरींतील अभिनंदनीय भागहि कोणता?

मनू-मामंजी संबंधाला अभिप्राय लेखकाचे तें 'शब्दजाल' नेमके लागूं पडतें. ''प्रथम भेटींत साक्षात्कार, मनूचा अस्वस्थपणा, त्यावेळीं प्रेमबीजाचें रोपण, पुढं दोघांनी कांहीं कमी यातना सोसल्या नाहीत, पण प्रेमाचा तो वृक्ष वाढतच गेला वगैरे.''

मनूनें दादाचा केलेला पाहुणचार, आतिथ्य आणि त्याचें नेटके, सुबक वर्णन, त्यालाच हे महाशय

भाळले आहेत. अहो, हा कादंबरीकाराच्या हातचा मळ आहे. ही कलाकुसरी तो लीलया करूं शकतो. परंतु या संबंधाधारें लेखकाला वाचकाशीं कांहीं हितगुज करायचें आहे काय? मुळीच नाहीं. ठासून सांगूं आम्ही. मग हा संबंध कशासाठीं निर्माण केला? उगीचच ! नाहीं. त्या पाठींमागे एक हेतू आहे आणि तो म्हणजे त्या चित्रकाराच्या, त्या कलाकाराच्या, त्या विलासप्रिय श्रीमान व्यक्तीच्या पार्श्वभूमीवर मनूच्या व्यक्तिमत्त्वाच्या कांहीं उज्वल पैलूंचें वाचकांना दर्शन घडविण्याचा. मनूच्या व्यक्तित्त्वाला त्यामुळें उठाव मिळाला आहे.

मात्र मनू-मामंजी हा संबंध चित्रित करून कादंबरी लेखकानें या आधारें वाचकाशीं हितगुज केले आहे. म्हणजेच लेखकाकडून विशेष आणि विशिष्ठ जीवन-पाथेय मिळाल्याचा तो रोकडा प्रत्यय आहे.

आतां मनूच्या या प्रातीभ मूर्तीवर तिच्याच स्तोत्रानें महाभिषेकासह या लेखनाची ही सांगता—

## जेथ प्रियाची परमसीमा। तो माऊली जाण आत्मा

असा हा अनंत प्रेमसागर, ज्ञानघन, ज्ञप्तिमात्र, अखंड दंडायमान आत्मराज ! छे ! छे ! हा शब्दहि जरा कटूच वाटतो. ती आत्ममाऊली ! ती हलूं लागली , डोलूं लागली, बोलूं लागली . चालण्यास सुरवात केली आहे आतां तिने ! तिचें नांव काय माहीत आहे ? मनू, मनोरमा, मृण्मयी. त्या ज्ञानमूर्तीला सुखाच्या डिऱ्या फुटल्या. तेच त्या मूर्तीचे हात झाले, पाय झाले. तें ज्ञान मुरलं, फार फार मधुर झालं. आतां त्याला एकट्याला करमेना झालं! त्यानं 'दादा' हें दुसरं नांव धारण केलं. दुर्गा हें तिसरं, बाबू हें चौथं, मामंजी हें पाचवं; यानंतर सहावं, सातवं, आठवं. असंख्य नांवं धारण केली ! आतां तें खेळिया बनलं ! असं खेळायला लागलं कीं, सांगता सोय नाहीं. सुखं सुखाच्याच घरीं भेटायला आलं. कधी तें 'दादा' झालं, त्यानं गुणगान करायला सुरवात केली. कधी तें 'काकी' होऊन कौतुक करूं लागलं. कधी तें 'बाबू' होऊन बडवायलाच लागलं—हातीं काठी घेऊन. 'मामंजी' झालं, भारावलेल्या अंतःकरणानें टुकुटुकु पहायला लागलं. गंमतच सुरू झाली. आनंदाचा भला मोठा डोह निर्माण झाला. त्यावर आनंदाच्या लाटावर लाटा उसळूं लागल्या. सुखं दुणावलं. ज्ञानच ज्ञानाची उपासना करूं लागलं, सेवा करू लागलं. त्या ज्ञानाला लोक मात्र म्हणतात, एक आदर्श भगिनी आणि ती जी उपासना सुरूं झाली, सेवा सुरूं झाली, त्याला लोक म्हणतात, आदर्श नैतिक व्यवहार, आतिथ्य अन् सत्कार. लोकांचा हा भ्रमिष्टपणा, दुसरं काय! आम्ही तो लौकिक विभाग समजतो. दुःख एवढेच कीं, आमचें हें बहुभाग्य त्यांच्या नशिबीं नाहीं.

माननीय आप्पासाहेब,

आपल्या या कादंबरीवर दीर्घकाळ, अत्यन्त खोलवर जाऊन चिंतन केले, त्याचें प्रतीक म्हणून माझें हें सर्व लेखन आहें. 'मृण्मयी' माझ्या जीवनांत कायमची बसून गेली. जीवनसाथी च झाली ती ! आतां तिचें सर्वकाळ गुणगान करणें हें माझ्या जीवनांतील अनेक व्रतांतील एक व्रत होऊन राहिलें आहे. **How to read it** म्हणजे कादंबरीचें वाचन कसे करावे येथपासून साधकाच्या अवस्था आणि सिद्धाची स्थिती येथपावेतों मी अनेकांना समजावून सांगत आहे. ही ज्ञानेश्वरी प्रवेशिका वाचा म्हणजे ज्ञानेश्वरींत उत्तम गति होईल, अशा शब्दांत मी पुष्कळांना सुचवितो आहे.

आतां कादंबरीचा प्रत्यक्ष रसास्वाद अथवा रसग्रहण या दृष्टीने हृदयांत एवढे दाटले आहे कीं, ते लिहिता कसे येईल हा मोठाच पेंच आहे. येथें खरी कसोटी आहे. खूप धडपड केल्यावर याबाबत असे म्हणावे वाटते कीं, आम्हांस लिहिण्यास सांगू नका, हां, बोलण्यास सांगा. वारेमाप बडबड करूं. तेहि आमच्यासारखे बेताबाती लोक समोर असतील तेव्हां. कादंबरी लेखकासारखे समोर असल्यावर तशी बडबड करणे म्हणजे काडवातीने सूर्याला

ओवाळण्याचें प्रदर्शन करण्यासारखे पोरकटपणाचे होईल. लिहीत असतां कितीएक प्रसंगीं असे वाटते कीं, त्या सौंदर्यस्थळांतील सौंदर्य उलगडून दाखवावे का सौंदर्य निर्मिती करणारा दिठावेल म्हणून त्याची दृष्ट काढावी ! काय करावे बरे ! मात्र जमत कांहींच नाहीं. असमर्थ लेखणीमुळें मनांतील मनोरथ मनांतच लय पावतात आणि उरते चुटपुट. 'उत्पद्यन्ते विलीयन्ते दरिद्राणां मनोरथाः।।' शब्द-दरिद्र्याची ही केविलवाणी अवस्था आहे. मात्र इतके सर्व असूनहि रसास्वाद शब्दांत कसा मांडला जातो हें मला तरी एक कोडेच आहे. गावं, नाचावं, उड्या माराव्या, ओरडावं, कंठ दाटून यावा, रडरडून मन मोकळं करावं, भलेऽ भलेऽ शाब्बास! म्हणून एकमेकांच्या हातावर टाळ्या द्याव्यात, विनोद घडल्यास मनमुराद हंसावं, भव्य-दिव्य लाभल्यास त्यांत हरपून जावं किंवा या कादंबरीचा स्थिरभाव जो भक्तिरस, त्यांत अवगाहन करावं, कृतार्थ व्हावं आणि ही विचार-संपदा, ही सौंदर्यकळा निर्माण करणाराचं मनोमनीं उदंड कल्याण चिंतावं बस्. यापरतें मी बापडा काय करूं शकणार ! कांहींहि करूं शकणार नाहीं. मात्र एक अवश्य करूं शकेन—

"वेडा झालो मी तव छंदें, मी गातों नाचतों आनंदें"

माननीय आप्पासाहेब,

सरली शब्दांची खटपट ।
केला कादंबरी-भाव स्पष्ट ।
झाला राजमार्ग नीट ।
ग्रंथ–रसास्वादनाचा ।।

हें तुम्हांसाठीं नाही केलें ।
जे कीं, अज्ञानपंकीं रूतले ।
अथवा अन्यमार्गी भ्रमले ।
ग्रंथ-भावार्थ सोडोनी ।।

नाकळे ज्या रहस्य परम ।
म्हणूनी त्यागिती हा ग्रंथ निरूपम ।
त्यातें बोध होईल सुगम ।
हा विश्वास मनिं जाला ।।

मी तो मंद अल्पमती ।
नाही लेखन-क्रियेची हातवटी ।
शब्द-कळा, सौंदर्य-दृष्टि ।
हे हि नाही मजपाशीं ।।

तरीहि धिटावा केला बहुत ।
मनीं स्मरोनी श्री रघुनाथ ।
तैसेचि आपुले आशिर्वच ।
म्हणोनी पैल उतरलो ।।

आपुल्या थोरिवेचें करिता स्मरण ।
माझें लघुत्व गेले हारपोन ।
समसमा संयोग होवोन ।
अखंड अद्वैत जाहलें ।।

ऐसे आपणा करूनी वंदन ।
दिव्य 'मनू'ते हृदयीं सांठवून ।
ओम् तत् सत् ऐसे वदोन ।
सकल ब्रह्मार्पणमस्तु ।।

बी. आर. ठोंबरे.
दिनांक : ८/१०/१९७२

संप्रदायविरहित ज्ञानवैभव हे ७०ते ८० टक्के आंधळें असतें. पण संप्रदायहि धड राहिले नाहीत. सगळे संप्रदाय मृतप्राय झाले आहेत. याचें कारण जिवंत व्यक्तींचा अभाव. याचा परिणाम म्हणजे आधुनिकांचे संप्रदायविरहित प्रबोधनाचें बंड उभे राहिलें आहें. सनातन्यांनी आजघडीला असंख्य संप्रदाय पुष्ट केले आहेत, ती निव्वळ सूज आहे आणि त्यांत औपचारिकता इतकी पराकोटीला गेली आहे कीं, तो पूर्णपणे निर्बुद्ध कार्यक्रम होऊन राहिला आहे.

या माझ्या भाष्य अथवा टीकेंत तुम्हांस वारकरी संप्रदायांतील भक्ति आणि ज्ञान यांच्या उज्वल स्वरूपाचें दर्शन होईल. भागवतांत नाथ म्हणतात—
वंदु आचार्य शंकरू । जो का ग्रंथार्थ विवेक चतुरू।
सारून कर्मठतेचा विचारू। प्रबोधदिनकरू प्रकाशला।।
हे खरे प्रबोधन. आधुनिकांचें प्रबोधन बेअकली आहे. आणि सांप्रदायिक प्रबोधनाला निव्वळ तोंड-पाटिलकीचें स्वरूप आले आहें. त्यांत जिवंतपण राहिलें नाहीं.